


# जन्मशताब्दी

२००४ - २००५ स्मृती सौरभ १६

# सर्वांसाठी गीता

## एक जीवनग्रंथ

### भाग-४



- प्रा. द. ना. दुभाषी

## ।। आशीर्वाद ।।



प. पू. श्री. अदृश्य काडसिद्धेश्वर स्वामीजी
सिद्धगिरी मठ, कणेरी

।। वंदे श्री सिद्धराम - काडसिद्धेश्वराभ्याम् ।।

# सर्वांसाठी गीता : एक जीवनग्रंथ

## भाग - ४ (अध्याय १३ ते १५)

### प्रा. द. ना. दुभाषी


मुद्रण :
देविका आर्ट प्रिंटर्स

मुखपृष्ठ :
माधव लाड

मुद्रित शोधन
श्री. ज्ञानेश्वर भालेकर

अक्षरजुळणी :
ओंकार कॉम्प्युटर्स, डोंबिवली

आवृत्ती पहिली :
मार्च २००५

मूल्य

प्रकाशक






सिद्धगिरी गुरुकुल फाऊंडेशन
कणेरी, कोल्हापूर


## प्रस्तावना

भगवान श्रीकृष्णाने अर्जुनाचे निमित्त करून जगाला सांगितलेली व भगवान व्यासांनी श्लोकबद्ध केलेली श्रीमद्भगवद्गीता हे जगातील आश्चर्यांपैकी एक आश्चर्य आहे. प्रा. द. ना. दुभाषी यांनी सहृदय अन्तःकरणाने ते आश्चर्य सर्वांनाच आपले वाटेल व दुरावा नाहीसा होईल अशा रीतीने त्यावर भाष्य केले आहे. प्रा. दुभाषी यांनी लेखमालेच्या स्वरूपात लिहिलेले हे भाष्य अनेकांना खूप आवडल्यामुळे ते त्यात आवश्यक ती भर घालून ग्रंथस्वरूपात प्रसिद्ध होत आहे. जनताजनार्दनाने दिलेली पोच सर्वांत मोलाची असते.

शरद ऋतूतील पूर्णचंद्राकडे जसे सर्व रसिक आकृष्ट होतात त्याप्रमाणे गीतेकडे सर्व सात्त्विक विचारवन्त आकर्षित होतात. दैनंदिन मानवी जीवनातील समस्यांचे भान ठेवून त्यांची व्यवहार, धर्म, नीती व अध्यात्म या चारही स्तरांवरील सोडवण या अद्‌भुत ग्रंथामध्ये आहे. युद्धातून बाहेर जाण्याचा अर्जुनाचा मोह १) व्यावहारिक दृष्टीने अकीर्तिकर आहे. २) 'मारला गेलास तर स्वर्ग लाभेल' हा धर्मशास्त्राचा निर्णय आहे. ३) युद्धनीतीच्या क्षात्रवृत्तीला ते शोभणारे नाही. ४) 'योगस्थ राहून संग सोडून कर्म कर' हा आध्यात्मिक उपदेश आहे. लेखकाने चारही स्तरांना चांगला न्याय दिला आहे.

गीतेची महाभारताची पार्श्वभूमी लक्षात घेऊन लेखकाने कामक्रोधादिकांचे प्रतिनिधी असलेले कौरव आणि दैवीसंपदेचे प्रतिनिधी असलेले पांडव यांच्या संघर्षाचे चित्र उभे केले आहे. 'जीवन हे कुरुक्षेत्र असून त्याचे धर्मक्षेत्र करण्यात पुरुषार्थ आहे,' हे वाक्य अंतःकरणाला भिडणारे आहे.

भगवान श्रीकृष्ण व त्याचा परमस्नेहीभक्त अर्जुन यांचे अवीट गोड चरित्र प्रारंभी सांगून औचित्य साधले आहे. सत्त्वगुण जेव्हा व्यक्तीचे 'हृदय ढिले' करतो व धर्म-अधर्माच्या संभ्रमाचे विष जेव्हा त्याच्या अंतःकरणात भिनते तेव्हा अर्जुनासारख्या 'नरशार्दूला'शी युद्ध करण्याची हिंमत दुर्योधनासारख्या 'कोल्ह्याला'ही होते. महान पराक्रमाला विवेकाची जोड नसेल तर तोही व्यर्थ ठरण्याची शक्यता असते. अविवेकाला पराक्रमाची साथ असेल तर त्याचाही विजय होण्याचा धोका असतो. उदा. दुर्योधनाचा पक्ष कितीही अन्यायाचा असला तरी त्याला भीष्म, द्रोण व कर्णासारख्या अतिमानुष योद्ध्यांची साथ होती. एकूण ईश्वराच्या राज्यात अन्यायाला पराक्रमाची साथ मिळू शकते! म्हणून न्यायाच्या पक्षानेही प्रचंड सामर्थ्य कमाविले पाहिजे. देवावर भार घालून भागत नाही.

गीतेच्या स्वरूपाची खरी ओळख प्रत्येक अध्यायाच्या शेवटी येणाऱ्या समाप्तीमध्ये आहे. 'श्रीमत् भगवत्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन संवादे' असे समाप्तीचे शब्द आहेत. गीतेला शास्त्रामध्ये स्मृती म्हटले आहे. कारण भगवान श्रीकृष्णाने रणांगणावर केलेल्या उपदेशाला भगवान व्यासांनी छंदबद्ध केले आहे. असे असले तरी गीतेला उपनिषदांचे मूल्य आहे. उपनिषदांप्रमाणेच ब्रह्मविद्या हा गीतेचा प्रमुख विषय आहे. ब्रह्मविद्येच्या अनुभवासाठी कर्म, भक्ती, ध्यान व ज्ञान अशा चारही योगांच्या शास्त्रांच्या अभ्यासाची जरूर आहे. क्षराक्षर विभाग, गुणत्तम विभाग इत्यादी योग पूरक आहेत.

हा संवाद कोणा सामान्य व्यक्तींमधील नसून जगद्गुरू भगवान श्रीकृष्ण व अधिकारसंपन्न शिष्य अर्जुन यांच्यातील असल्याने तो संवाद परम श्रद्धेय आहे, हा विचार लेखकाने जागोजागी मांडला आहे.

'जीवो जीवस्य जीवनम्' या गीतेतील सिद्धान्ताचा दोन प्रकारे अर्थ करता येतो. जगण्यासाठी एक जीव दुसऱ्या जीवाला खातो हा पहिला अर्थ असून एक जीव जीवनासाठी दुसऱ्यावर अवलंबून असतो, हा दुसरा अर्थ आहे. कोणताही अर्थ स्वीकारला तरी जीवन संघर्षमय असते हे त्याचे तात्पर्य आहे. ही ईश्वरी व्यवस्था असल्याने अनिवार्य आहे. या संघर्षमय जगात एका व्यक्तीने ज्या तत्त्वज्ञानाच्या आधाराने जगून आपले ऐहिक व पारलौकिक कल्याण साधावे ते तत्त्वज्ञान गीतेत मांडले आहे. प्रारब्ध प्रतिकूल असेल तर सृष्टीच्या झंझावातात (उदा. महायुद्धे, दंगे इ.) किंवा निसर्गाच्या तडाख्यात (उदा. धरणीकंप, वादळे इ.) जीव सापडतो व कदाचित कोणत्याच कल्याणाची संधी न मिळता त्याचे जीवन संपते. पण त्याने त्या दिशेने जे थोडेफार प्रयत्न केले असतील त्यांचे फळ म्हणून त्याला पुढील जन्मात अनुकूलता मिळते. या आश्वासनावर निर्भर राहून व्यक्तीने निष्काम कर्म, निष्काम उपासना, ध्यान व ज्ञान यांची कास धरून आपले जीवन उत्साहाने व आनंदाने जगावे.

ग्रंथाचे परीक्षण किंवा रसग्रहण करणे हा प्रस्तावनेचा हेतू नाही. लेखकाने आरंभलेल्या यज्ञात एक समिधा अर्पावी एवढ्या माफक हेतूने चार शब्द लिहिले आहेत. या यज्ञाचा प्रसाद वाचक व साधकांनी भरभरून ग्रहण करावा, ही भगवान श्रीकृष्ण चरणी प्रार्थना.

**– डॉ. श्रीकृष्ण देशमुख**
मुरगूड, कोल्हापूर

## लेखकाचे मनोगत

श्रीमद्भगवद्गीता हा केवळ तत्त्वज्ञानाचा, पारायणाचा व पूजेचा ग्रंथ नसून, तो आपल्या लौकिक, व्यावहारिक जीवनाच्या सर्व क्षेत्रांत मार्गदर्शक ठरणारा वैश्विक ग्रंथ आहे. असा हा ऐहिक व पारलौकिक कल्याण करणारा ग्रंथ सर्वांना सहज समजेल अशा सोप्या, सुबोध भाषेतून सांगण्यासाठी, कोल्हापूर येथील 'गीतामंदिर पत्रिके'तून लेखमाला सुरू केली. यामध्ये जून १९९६ पासून डिसेंबर २००१ पर्यंत एकूण ६२ लेख प्रसिद्ध झाले. या पत्रिकेत पानांची मर्यादा असल्यामुळे सुरुवातीस लेखनमर्यादाही आली. त्यामुळे पुनर्लेखन करून याचा थोडा अधिक विस्तार केला. व आज हे पुस्तकरूपाने पाच खंडांत प्रसिद्ध होत आहे. गीतेच्या विचारांचा म्हणजे प्रत्यक्ष भगवान श्रीकृष्णाच्या विचारांचा प्रचार व प्रसार करणे म्हणजे भगवंताला आवडणारी खरी भक्ती (अ.१८ श्लोक ६८) असे समजूनच हा प्रयास केला आहे.

प. पू. अदृश्य काडसिद्धेश्वर स्वामी महाराज यांच्या प्रेरणेने व कृपाशीर्वादाने हा संकल्प पूर्ण होत आहे. ब्रह्मलीन जगद्गुरू श्री काडसिद्धेश्वर महाराज यांच्या जन्मशताब्दी वर्षाच्या निमित्ताने प. पू. अदृश्य स्वामीजींनी या शताब्दी वर्षात १०० मौलिक पुस्तके प्रसिद्ध करण्याचा शुभ संकल्प सोडला आहे. त्यांच्या या अपूर्व ज्ञानयज्ञात सहभागी होण्याचे परमभाग्य मला लाभले, हे मी माझे पूर्वसुकृत समजतो. गीतेतील संन्यासी हा कर्मयोगी कसा असावा याचा आदर्श, म्हणजे प. पू. अदृश्य स्वामीजी होत. अंतःकरणातून शांत, संन्यस्त व बाहेरून सतत कर्मशील असणारे व जनसामान्यांसाठी कामाचा डोंगर उभा करणारे हे अनासक्त कर्मयोगी आहेत. अत्याधुनिक, सुसज्ज सिद्धगिरी हॉस्पिटल व रिसर्च सेंटर, १०० योगग्रामांची निर्मिती करण्यासाठी, स्त्री-पुरुष योगशिक्षकांना प्रशिक्षित करण्याची योजना, शेतीसाठी व पाणीपुरवठ्यासाठी केलेल्या योजना व त्यात हा ज्ञानयज्ञ... स्वामीजींचे हे सर्व शुभसंकल्प, ईशकृपेने पूर्ण होतील हे निःसंशय!

या ज्ञानयज्ञात पुस्तकरूपाने वाहिलेली ही माझी अल्पशी समिधा आहे.

गीता प्रेस, गोरखपूरचे संस्थापक महान भगवद्भक्त कै. जयदयाल गोयनका यांचे नातू श्री. माधवप्रसाद गोयनका हे या गीतापत्रिकेचे संस्थापक-संपादक आहेत. त्यांचा गीतेचा अभ्यास व व्यासंग सखोल आहे. श्री. गोयनका यांचे प्रोत्साहन व सहकार्य यामुळे हे लेखन पार पडले, याबद्दल कृतज्ञतापूर्वक मी त्यांचे आभार मानतो. श्री. मुळजीभाई शहा व इतर विश्वस्त यांचाही मी सदैव ऋणी आहे. या पाच वर्षांच्या लेखनकाळात, असंख्य वाचकांनी, पत्ररूपाने पाठविलेल्या बोलक्या प्रतिक्रिया व प्रतिसाद यामुळे उत्साह व बळ लाभले, याबद्दल मी कृतज्ञता व्यक्त करतो.

श्रोत्रिय, ब्रह्मनिष्ठ व प्रसिद्ध प्रवचनकार डॉ. श्रीकृष्ण देशमुख यांची प्रस्तावना या पुस्तकास लाभली आहे. अध्यात्मक्षेत्रात त्यांनी केलेले उत्तुंग कार्य, हे माझ्यासारख्या साधकांना सदैव मार्गदर्शनपर ठरले आहे. त्यांनी तत्परतेने लिहिलेल्या प्रस्तावनेबद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

गीतेवर भाष्य करण्याचा माझा अधिकार नाही. गीता जशी मला समजली व त्यामुळे माझ्या जीवनात जो मला प्रसाद लाभला, तसा तो सर्वांना मिळावा या हेतूने भक्तिपूर्वक केलेले हे लिखाण आहे. हे अधिकाधिक वाचकांपर्यंत पोहोचावे ही इच्छा केवळ प. पू. अदृश्य स्वामीजींच्या आज्ञेने व आशीर्वादाने पूर्ण होत आहे याबद्दल मी पुन्हा एकदा मनापासून आभार मानून हे मनोगत पूर्ण करतो.

– प्रा. द. ना. दुभाषी

रत्नोदय सोसायटी,
२४६ अ/ई, नागाळा पार्क, कोल्हापूर.
(फोन : (०२३१) २६५१०४४
५६१२३८१

।। श्री कृष्णार्पणामस्तु ।।

# ।। ग्रंथदान ।।

**शतेषु जायते शूरः सहस्त्रेषु च पण्डितः ।**
**वक्ता दशसहस्त्रेषु दाता भवती वा न वा ।।**

वरील सुभाषितात म्हटल्याप्रमाणे, दाता भेटण ही खरोखरच फार दुर्मिळ बाब आहे. एका सत्पुरुषाने दात्याला साक्षात देवाची उपमा दिली आहे, ते म्हणतात, “देव व दाता यात अंतर ते कोणते?”

परंतु जगद्गुरु काडसिद्धेश्वर महाराजांच्या आशीर्वादातून व प.पू. अदृश्य काडसिद्धेश्वर महाराजांच्या आचरणरुपी प्रेरणेतून एखादा दाता नावारुपाला येण यात विशेष ते काय! पाठीवर कृपा करणारा हात असेल तर पुढे जाण्यात वेगळीच मजा असते.

श्री. राजू आंब्रे यांनी या पुस्तकासाठी अर्थदान करुन गुरुमाऊलीची कृपा संपादन केली आहे. म्हणून त्यानंतर सर्वांसाठी गीता एक जीवनग्रंथ भाग - ४ हे १६वे ग्रंथपुष्प त्यांच्यातर्फे गुरुचरणी अर्पण!

प्रकाशक
सिद्धगिरी गुरुकुल फाऊन्डेशन
कणेरी, कोल्हापूर

## अनुक्रमणिका



# अध्याय तेरावा
# क्षेत्रक्षेत्रविभागयोग

गीतेचे पहिले दोन खंड पूर्ण झाले. तृतीय षडध्यायाची सुरुवात १३ व्या अध्यायापासून होते आहे. क्षेत्रक्षेत्रज्ञविभागयोग हे या अध्यायाचे सार्थ नाव आहे. मागील १२ व्या अध्यायात भक्तियोग पूर्ण केल्यानंतर, या अध्यायात भगवान स्वतःच बोलू लागले आहेत. ११ व्या अध्यायापासून, भगवंताच्या भावमय अंतःकरणाचे सुखद दर्शन अर्जुनाला घडले आहे. अर्जुन सखा, शिष्य असल्यामुळे भगवंताचे अंतःकरण भावप्रेमाने भरलेले आहे. गीता जसा ज्ञानाने भरलेला परिपूर्ण ग्रंथ आहे तसाच तो भगवंताच्या भावप्रेमानेही भरलेला आहे. गीता सर्वशास्त्रमयी असल्यामुळे कोणत्याही शास्त्रातील सिद्धान्त गीतेत नाहीत असे नाही. उपनिषदांचे सारभूत तत्त्वज्ञान गीतेत प्रतिपादिले आहे. त्यामुळे प्रत्येक अक्षर हे सूत्राच्या स्वरूपात, शब्द हा मंत्राच्या स्वरूपात तर श्लोक हा सिद्धान्ताच्या स्वरूपात मांडला आहे. व्यासांनी संपूर्ण जीवनाचे सार भगवद्‌गीतेत ओतले आहे. इतर ग्रंथांप्रमाणे गीतेत विस्तार नाही. नेमके, नेटके तत्त्वज्ञान विशद झाले आहे. ते तत्त्वज्ञान प्रत्येकाला जीवनात पडताळून पाहता येणे शक्य आहे. महात्मा गांधींना गीतेतून जीवनातील समस्यांची उकल होत होती. ते म्हणायचे की, ''जेव्हा जेव्हा मी समस्यांनी ग्रस्त, दिङ्‌मूढ व्हायचो, तेव्हा तेव्हा मी गीतारूपी आईच्या कुशीत जात असे. गीता माझे प्रश्न सोडवी.'' विनोबा देखील गीतेला माऊली म्हणत. या सूत्रबद्ध गीतेचा भावार्थ श्री ज्ञानेश्वरांनी ९००० ओव्यांमध्ये केला. भगवंतांच्या मनातील गूढार्थ त्यांनी विस्ताराने सांगितला. १३ व्या अध्यायातील भगवंतांनी सांगितलेल्या पाच श्लोकांतील ज्ञानाच्या लक्षणांवर (श्लो. ७ ते ११) श्री ज्ञानेश्वरांनी एकूण ६८० ओव्या लिहिल्या. काव्य, तत्त्वज्ञान यांनी भरलेल्या या रसाळ ओव्यांमध्ये श्री ज्ञानदेवांनी आपला सारा अनुभव ओतला आहे. हा भावार्थ वाचून पूज्य विनोबांनी म्हटले आहे की, ''ज्ञानदेवांची भाषा मला चाखावयास मिळाली, याची मला धन्यता वाटते; ज्ञानेश्वरांनी गोड भाषा माझ्या तोंडात बसावी म्हणून पुनःपुन्हा जन्म प्राप्त झाला तरी मला धन्यता वाटेल.'' गीतेचे सार, तात्पर्य काढताना आद्य श्री शंकराचार्यांनी ज्ञानावर भर दिला, लोकमान्य टिळकांनी

कर्मावर जोर दिला, महात्मा गांधींनी अनासक्तीवर विशेषत्वाने लक्ष वेधले, डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन यांच्या मते आत्मोद्धार हे गीतेचे सार आहे, तर योगी अरविंद यांच्या मते संपूर्ण शरणागती हे गीतेचे तात्पर्य आहे. ज्ञानेश्वरांच्या मते साक्षात्कार हे गीतेचे सारसर्वस्व आहे. अलीकडच्या काळातील महान साक्षात्कारी संत, तत्त्वज्ञानी डॉ. आर. डी. रानडे यांनी आपल्या 'The Bhagavatgita as a Philosophy of God Realisation' या ग्रंथात गीतेचा हाच साक्षात्कारपर अर्थ लावला आहे. स्वाध्यायाचे प्रणेते पू. पांडुरंगशास्त्री आठवले ह्यांनी ज्ञान, कर्म व भक्ती यांचा समन्वय गीतेतून साधला आहे. जगातील ४५० पेक्षा अधिक विद्वान पंडितांनी गीतेवर वेगवेगळ्या दृष्टिकोनांतून भाष्ये केली आहेत.

गीता तुमच्या-आमच्यासाठी संजीवनी आहे. दीपस्तंभासारखी, अज्ञान-मूढ जनांना मार्गदर्शन करणारी माऊली आहे. गीता हे जीवनोपयोगी शास्त्र आहे. तो जीवनग्रंथ आहे. म्हणूनच हा ग्रंथ अभ्यासायचा आहे. ''२१ वे शतक हे ज्ञानाचे, श्री ज्ञानेश्वराचे शतक आहे,'' असे उद्गार पंतप्रधान अटलबिहारी वाजपेयींनी एका समारंभात काढले होते. विज्ञान, अध्यात्म या दोहोंचे ध्येय एकच आहे. अंतिम सत्याचा शोध करीत, मानवी जीवन अंतर्बाह्य सुखी, शांत, समाधानी, तृप्त व्हावे, याचाच ध्यास या दोहोंनाही आहे. 'जे पिंडी ते ब्रह्मांडी' या न्यायाने अंतःकरण हेच सुखदुःखाचे मूळ आहे. माणसाच्या मनोव्यापारामध्ये जीवनाची रहस्ये दडली आहेत. बाहेरील जग कितीही जाणले तरी या अंतर्विश्वाचा शोध-बोध झाल्याशिवाय आत्मसुख प्राप्त होत नाही. स्वतःला स्वतःची ओळख होणे हेच खरे आत्मज्ञान. इतर पशुप्राण्यांपेक्षा माणसाला जे बुद्धीचे वरदान आहे, त्यानेच मनुष्यजन्माचे सार्थक करून घ्यायचे आहे. गीता केवळ पूजा-पारायणाचा ग्रंथ नाही. मानवी बुद्धीसारखा अचाट, महान, अनाकलनीय, दिव्य असा कॉम्प्युटर दुसरा नाही. बुद्धीनेही गीता समजून घ्यायची आहे. मी कोण? हे विश्व काय आहे ? माझा व विश्वाचा काय संबंध आहे ? तो विश्वेश्वर कसा आहे? त्याचे स्वरूप व त्याचा माझा संबंध काय आहे ? हा देह म्हणजे काय ? या देहात काय भरले आहे ? या देहाची मालकी कोणाची ? मनुष्यदेहाचे, जन्माचे सार्थक कशात आहे ? नेमके ज्ञान व सुख कशात आहे ?... अशा सर्व प्रश्नांची उत्तरे भगवंतांनी गीतेत दिली आहेत. अर्जुन जसा मोहमुक्त झाला, तसेच आपण व्हायचे आहे. म्हणून जीवनाची निश्चित दिशा, ध्येय समजण्यासाठी गीता अभ्यासायची आहे. 'केवळ देहरूप मी आहे' या देहात्मक भावनेच्या अनाठायी, अतिरेकी, अमर्याद हव्यासामुळेच



आज जीवनाची शोकमयता वाढली आहे. अनियंत्रित भोगलालसा या देहात्मकतेमुळेच निर्माण झाली आहे. या मृण्मय देहात त्या चिन्मयाचा अंश आहे हे गीता समजावते. आज सर्वत्र देहभावनेमुळे इंद्रियचोचले चालले आहेत. देहालाच सर्वस्व मानून देहाची पूजा चालू आहे. अशा काळात गीतेचे तत्त्वज्ञान समजावते की, 'मी' म्हणजे देह नव्हे. 'मी' जो आहे तो या देहापासून पूर्णपणे वेगळा, पवित्र, अव्यंग, अज, अमर असा आहे. देह एक साधन आहे व या देहरूपी साधनापासून 'मी' वेगळा आहे. या देहाच्या पलीकडचे अमर, अविनाशी विशुद्ध आत्मतत्त्व ते 'मी' आहे. उपनिषदांनी पुनःपुन्हा सांगितलेली घोषवाक्ये 'तत्त्वमसि' 'अहं' ब्रह्मास्मि'... 'ते आत्मरूप तू आहेस,' 'तूच तुझ्या जीवनाचा भाग्यविधाता, शिल्पकार आहेस,' 'ते अमृत तुझ्यात आहे. तू अमृताचा पुत्र आहेस' हेच पवित्र उद्गार गीतेने घोषित केले आहेत. ही विश्वशक्ती माझ्यात आहे याचा विश्वास जेवढा वाढेल, तेवढा माझा जीवनविकास होईल, या शक्तीची अनुभूती-प्रचीती जेवढी होईल तेवढे दिव्यत्व माझ्या जीवनात येईल, अशी प्रचीती संत-महात्म्यांना झाली आहे. सॉक्रेटिससारख्या महान तत्त्वज्ञान्याला विष देऊन मारावे, अशी शिक्षा देण्यात आली. विष देण्याची वेळ आली त्या वेळी सॉक्रेटिस आनंदी होता. त्याच्यावर प्रेम करणारे मात्र रडत होते. सॉक्रेटिसने सर्वांना समजावले की, आत्मा अमर आहे. मी म्हणजे देह नव्हे. त्यामुळे मला कोण मारणार व कोण पुरणार ? आत्म्याच्या अमरत्वाविषयी त्यांनी शिष्याला समजावले. आज अडीच हजार वर्षे झाली तरी तो महान सॉक्रेटिस सर्वांना पुरून उरला आहे. रामकृष्ण परमहंस यांना शेवटी कॅन्सर झाला. लोकांना याचे अनावर दुःख होत होते. रामकृष्णांनी सर्वांना समजावले, ''कॅन्सर झाला आहे. पण कुणाला ? माझ्या देहाला. माझा देह दुःख भोगतो आहे. मी देह नाही. मी निराळा आहे. मला तर काहीच त्रास होत नाही.'' हीच गोष्ट महान तपस्वी रमण महर्षी यांची ! ही गोष्ट समजावण्यासाठी 'नानु यारू?' (मी कोण?) हे शीर्षक असलेले त्यांनी एक पुस्तकही लिहिले.

१३ व्या अध्यायात भगवंतांनी देह, आत्मा, ईश्वर-स्वरूपाविषयीचे ज्ञान सांगितले आहे. सातव्या अध्यायापासून ज्ञान-विज्ञान सांगण्यास सुरुवात झाली आहे. त्याचाच हा पुढील विस्तार आहे. परमेश्वराचे पूर्ण ज्ञान होण्यास, बाह्यसृष्टीच्या क्षराक्षरविचाराबरोबरच मनुष्याचे शरीर आणि आत्मा किंवा क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचा विचार व्हावा लागतो. त्या दृष्टीने ह्या १३ व्या अध्यायाची योजना आहे.

श्री भगवान म्हणतात,

**इदं शरीरं कौंतेय क्षेत्रमित्यभिधीयते ।**
**एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ।।१।।**
**क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत ।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ।।२।।**

''हे कौंतेया ! या शरीराला 'क्षेत्र' असे म्हटले आहे. याला जो जाणतो त्यास तद्विद म्हणजे याचे तत्त्व जाणणारे ज्ञानी लोक 'क्षेत्रज्ञ' असे म्हणतात.'' ।।१।।

''सर्व क्षेत्रांमध्ये हे भारता ! क्षेत्रज्ञसुद्धा मीच असे समज. क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांना तत्त्वतः जाणणे हेच माझ्या मते 'ज्ञान' आहे.'' ।।२।।

ह्या अध्यायात क्षेत्र व क्षेत्रज्ञाचा विचार उभा केला आहे. क्षेत्र म्हणजे शेत, आणि क्षेत्रज्ञ म्हणजे शेताला जाणणारा... शेताचा मालक ! माणसाची विचार करण्याची सुरुवातच शरीरापासून होते. माणूस जसजसा उन्नत होईल तसतसा तो शरीराच्या अंतर्बाह्य स्वरूपासंबंधी अधिक चिंतनशील बनतो. पहिला प्रश्न निर्माण होतो की, या शरीरावर सत्ता कुणाची चालते? हे कोणाच्या मालकीचे आहे ? जगद्‌गुरू संत तुकारामांना हा प्रश्न पडला व त्यांनी त्याचे उत्तरही दिले. ते म्हणतात -

**कोणाचिये सत्ते चाले हे शरीर ।**
**आपुलिया बळे नाही मी बोलत ।**
**सखा कृपावंत वाचा त्याची ।।१।।**

या अध्यायाच्या सुरुवातीलाच भगवंतांनी हे प्रश्न उभे करून त्याची उत्तरे दिली आहेत. देह हा 'क्षेत्र' आहे आणि आत्मा हा 'क्षेत्रज्ञ' आहे. मनुष्याचे कर्तव्य त्याच्या देहाच्या आधारेच पार पाडावयाचे असते. हे शरीर आपण कसे वापरतो, यावरच इहलोकातील व परलोकातील आपली अवस्था अवलंबून असते. एखाद्या चतुर शेतकऱ्याप्रमाणे आपल्याला आपले हे देहरूपी शेत वापरले पाहिजे आणि यात कर्म, भक्ती व ज्ञानाचे पीक घेतले पाहिजे. 'नर अपनी करनी करे तो नर का नारायण हो जाये' हे जितके खरे, तितकेच त्याच्या नरकप्राय अवस्थेलासुद्धा आपलीच कर्मे जबाबदार असतात.

''अस्ति जायते वर्धते विपरिणमते अपक्षीयते नश्यति ।'' असे या देहाचे स्वरूप आहे. जे जन्मले त्यांना मृत्यू अटळ आहे. पण अशा नश्वर देहात अविनाशी चिरंतन चैतन्य वसते आहे, याचे भान देहवादींना नसते.



या देहाच्या उपाधीबाबत श्री ज्ञानेश्वर म्हणतात,

**या उपाधिमाजी गुप्त । चैतन्य असे सर्वगत ।**
**तें तत्त्वज्ञ संत । स्वीकारिती** ।।१२६ अ. २ ।।

''या देहादी प्रपंचामध्ये सर्वत्र चैतन्य गुप्त रूपाने आहे. तत्त्व जाणणारे संत ते ओळखून त्याचे ग्रहण करतात.'' हे चैतन्य म्हणजेच आत्मा म्हणजेच क्षेत्रज्ञ.

भगवंत म्हणतात की, भिन्न भिन्न क्षेत्रांत (देहांत) राहणारा हा क्षेत्रज्ञ (आत्मा) वेगवेगळ्या देहांत वेगवेगळा भासतो. पण वास्तविक तो वेगवेगळा नसून तो एका परमेश्वराचाच अंश आहे. क्षेत्र व क्षेत्रज्ञाचे स्वरूप तत्त्वतः जाणणे हेच 'ज्ञान' आहे. वेदांतात ज्ञान शब्दाचा अर्थ जाणणे, समजणे एवढाच नसून ईश्वरानुभव किंवा अद्वैतानुभव असा आहे. तेच आत्मज्ञान किंवा यथार्थ ज्ञान, असे भगवंत या श्लोकात सांगतात.

श्री भगवान पुढे म्हणतात,

**तत्क्षेत्रं यच्च यादृक् च यद्विकारि यतश्च यत् ।**
**स च यो यत्प्रभावश्च तत्समासेन मे शृणु ।।३।।**
**ऋषिभिर्बहुधा गीतं छंदोभिर्विविधैः पृथक् ।**
**ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ।।४।।**

''क्षेत्र म्हणजे काय, ते कशा प्रकारचे आहे, त्याचे विकार कोणते, आणि ज्या कारणापासून जे झाले आहे, तसेच तो म्हणजे क्षेत्रज्ञ कोण व त्याचा प्रभाव काय, हे मी संक्षेपाने सांगतो ऐक.'' ।।३।।

''बहुत प्रकारे, विविध छंदांनी, पृथक् ऋषींनी आणि (कार्यकारणरूप) हेतू दाखवून पूर्ण निश्चित केलेल्या ब्रह्मसूत्रातील पदांनीही हे म्हणजे हा विषय गायिला आहे.'' ।।४।।

क्षेत्र म्हणजे काय, ते कशा प्रकारचे आहे, त्याचे भिन्न भिन्न विकार (बदल) कोणते आणि कशापासून काय होते - हे सर्व क्षेत्रासंबंधीचे ज्ञान आहे. तसेच क्षेत्रज्ञ यांना तत्त्वतः जाणणे हे क्षेत्रज्ञासंबंधीचे ज्ञान आहे. या दोन्हींबद्दल भगवंत संक्षेपाने सांगत आहेत.

भगवंत म्हणतात की, याविषयी अनेक ऋषींना भिन्न भिन्न काळी द्रष्टेपणाने जे स्फुरले ते तत्त्व-विचार वेद-उपनिषदांतून व्यक्त झाले आहेत. तसेच ब्रह्मसूत्रांनी ह्या विचारांचे पूर्ण निश्चित केलेले युक्तिपूर्ण विवेचन केले आहे.

अध्यात्म-ज्ञानात क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचे ज्ञान अत्यंत महत्त्वाचे आहे. किंबहुना अध्यात्म म्हणजे जीव, जगत् आणि जगदीश्वर यांचाच विचार

होय. या दृष्टीने काहींच्या मते गीतेचे अध्ययन करताना प्रथम गीतेतील तेराव्या अध्यायाचा अभ्यास करावा. हे या अध्यायाचे महत्त्व आहे.

आता पुढील दोन श्लोकात ते 'क्षेत्र' याची व्याख्या करीत आहेत.

**महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च ।**
**इंद्रियाणि दशैकं च पंच चेंद्रियगोचराः ।।५।।**
**इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः ।**
**एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ।।६।।**

''(पृथिव्यादि पाच) महाभूते, अहंकार, बुद्धी आणि अव्यक्त (प्रकृती) तसेच दहा (सूक्ष्म) इंद्रिये व मन (एक) आणि (पाच) इंद्रियांचे पाच (शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे सूक्ष्म) विषय.'' ।।५।।

''इच्छा, द्वेष, सुख, दुःख, संघात, चेतना आणि धृति या (तत्त्वांच्या) समुदायास सविकार क्षेत्र असे म्हटले आहे.'' ।।६।।

पाचव्या श्लोकात सांख्यांच्या पंचवीस तत्त्वांपैकी पुरुष सोडून बाकी चोवीस तत्त्वे आली आहेत. इथे दोन्ही श्लोकांत भगवंतांनी ३१ तत्त्वे स्पष्टपणे सांगितली आहेत. पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश ही पाच महाभूते; अहंकार; बुद्धी; अव्यक्त म्हणजे प्रकृती; पाच ज्ञानेंद्रियेः पाच कर्मेंद्रिये; मन; इंद्रियांचे पाच विषय; इच्छा; द्वेष; सुख; दुःख; संघात; चेतना व धृती- असे हे ३१ तत्त्वांचे क्षेत्र आहे. या ३१ तत्त्वांचा सविस्तर विचार पाहू.

पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश अशी पाच महाभूते आहेत आणि ती उत्तरोत्तर सूक्ष्म आहेत. ती उत्तरोत्तर सूक्ष्म असल्यामुळे जेवढे सूक्ष्मत्व येते, तेवढे स्वच्छत्व येते व शक्तीही अधिक असते. पृथ्वीपेक्षा आप (पाणी) सूक्ष्म आहे, आपापेक्षा तेज, तेजापेक्षा वायू व वायूपेक्षा आकाश सूक्ष्म आहे.

जशी पंचमहाभूते आहेत, तशी इंद्रिये, मन, बुद्धी व शरीराला पकडून ठेवील अशीही एक शक्ती आहे. तिला 'अहंकार' म्हणतात. 'अहं' ही मोठ्यात मोठी गोष्ट आहे. पाचही महाभूतांची गाठ पडून जेव्हा देहाचा आकार व्यक्त होतो, तेव्हा तो जीवाला चहूंकडून नाचवितो. तोच 'अहंकार' होय. 'अहं' स्वतःची सृष्टी निर्माण करते. त्यासाठी एक दृष्टान्त असा ..... रात्री आपण झोपतो. गाढ झोपेत अहंकार नसतो. (तसा तो सूक्ष्म रूपात असतो. पण तो अनुभवाला येत नाही. पण झोपेत आपल्या आंगठ्याला जरी कोणी स्पर्श केला तरी आपण जागे होतो. म्हणजे पायाच्या आंगठ्यापासून मस्तकापर्यंत एक शक्ती आहे, जी गाढ झोपेत सुप्त होती. आणि गाढ



झोपेत असेतोपर्यंत आपण अद्वैत स्वरूपात म्हणजे ''न मे द्वेषरागौ न मे लोभमोहौ ...' अशा स्थितीत होतो. सर्व इंद्रियांना पकडून असलेला 'अहं' जागा झाला आणि आपण 'शंकरराव', 'सुभाषराव' असे झालो. विश्वापासून वेगळे झालो. 'पाहिजे नको' 'आपला-परका' असा भाव निर्माण झाला. हे सर्व ज्याच्यामुळे होते, ती शक्ती 'अहं' आहे. या 'अहं' वृत्तीने पांचभौतिक जड देहाशी ऐक्य केले असता, त्या देहाकारावर झालेल्या 'अहं'ला अहंकार म्हणतात. अर्थात देहाशी ऐक्य नाहीसे होऊन नुसती राहिलेली 'अहंवृत्ती' हे शुद्ध जीवाचे किंवा परमेश्वराचे स्वरूप होते.

देहाला कातडीसारखा चिकटलेला हा अहंकार भगवंताला अर्पण करूनच आपण सुटू शकतो. अन्यथा 'मी', 'माझे' म्हणतच प्रपंचात गटांगळ्या खाणे अपरिहार्य होते.

दुसरी एक शक्ती आहे. ती म्हणजे बुद्धी ! बुद्धी ही भगवंताचा कॉम्प्युटरच आहे. बुद्धितत्त्व हे निर्णय-निश्चय करणारे एक शक्तितत्त्व आहे. प्रत्येक वस्तूचा आपल्या बुद्धीवर आघात होतो. बुद्धी म्हणजे आघात स्वीकारणारा व सांभाळणारा कॉम्प्युटर ! आपण कपाळाला टिळा लावतो ते वास्तविक 'बुद्धी-पूजन' आहे. भगवंतांनी बुद्धीमध्ये वेगवेगळ्या खोल्या ठेवल्या आहेत. विवेकबुद्धी, समस्याविमोचन, निर्माणक विचारशक्ती, निश्चयशक्ती, कामना-विषय यांची निर्मिती... आपल्या बुद्धीत प्रचंड सृजनशक्ती वसते. त्याचा जो जेवढा वापर करतो, तेवढा तो बुद्धिमान ! याच बुद्धीला, शुद्ध-अशुद्ध, पाप-पुण्य, सुख-दुःख, प्रवृत्ती-निवृत्ती, बन्ध-मोक्ष, कार्य-अकार्य, भय-अभय, निंद्य-उत्तम, लहान-थोर हे उत्तम समजते. सारासार विचार करून काय निवडावे, याची निर्णयशक्ती याच बुद्धीत असते. जी तेजतत्त्वाचे उत्पत्तिस्थान आहे, जी सत्त्व गुणाची वाढती अवस्था आहे आणि जी आत्मा व जीव यांच्यामधील जागेत असते, ती बुद्धी ! जीवाच्या ठिकाणी जी जाणीवरूप ज्ञानवृत्ती स्फुरते ती ही बुद्धी !!

'अव्यक्त' तत्त्वालाच प्रकृती म्हणतात. प्रकृती त्रिगुणात्मक आहे. 'अव्यक्तम्' ही माया आहे. सांख्यशास्त्रात प्रकृती व पुरुष अशी दोन स्वतंत्र तत्त्वे मानतात, पण हे द्वैत सोडून देऊन प्रकृती व पुरुष ही दोन्ही तत्त्वे एकाच नित्य व निर्गुण परमात्म्याच्या विभूती होत, असे गीता मानते. सांख्य ज्याला पुरुष म्हणतात त्यालाच गीतेत जीव म्हटले असून जीव हा ईश्वराची 'परा प्रकृति' म्हणजे श्रेष्ठ स्वरूप होय आणि सांख्य जिला मूळप्रकृती म्हणतात, तिलाच गीतेत परमेश्वराचे 'अपर' म्हणजे आपले कनिष्ठ स्वरूप म्हटले आहे (गी. अ. ७ श्लो. ४ व ५). ही प्रकृती आठ प्रकारची आहे, असे

वर्णन आपण पूर्वी सातव्या अध्यायात पाहिले आहे. रात्र उजाडल्यावर तारे जसे आकाशात लीन होतात अथवा सूर्यास्त झाल्यावर प्राण्यांचे व्यवहार जसे थांबतात, त्याप्रमाणे स्थूल धर्म टाकून पंचमहाभूते व पंचमहाभूतांपासून झालेले समस्त व्यक्त जग ही सूक्ष्म होऊन जेथे लीन होऊन जातात, ते म्हणजे 'अव्यक्त' असे ज्ञानेश्वर म्हणतात.

'इंद्रियाणि दशैकं' म्हणजे कान, डोळे, त्वचा, नाक, जिव्हा ही पाच ज्ञानेंद्रिये व जीभ, हात, पाय, उपस्थ व गुद ही पाच कर्मेंद्रिये होत. शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पाच ज्ञानेंद्रियांचे पाच प्रकारचे विषय आहेत. श्री ज्ञानेश्वरांनी कर्मेंद्रियांचे अधिक पाच विषय सांगितले. तोंडाने स्वर व अक्षर यांचा उच्चार करणे, हाताने घेण्याची अथवा टाकण्याची क्रिया करणे. पायाने चालणे, उपस्थाने मूत्राचा त्याग करणे व गुदाने मलाचा त्याग करणे हे पाच कर्मेंद्रियांचे विषय होत.

'एकम्' म्हणजे मन ! भगवंतांनी प्रत्यक्ष मन न म्हणता 'एकम्' म्हटले आहे. भगवंताकडे आणि तसेच प्रपंचाकडेही नेणारे व म्हणूनच मोक्ष किंवा बंधनाला कारण असणारे मन हे भगवंताचे लाडके अपत्य आहे. गीतेमध्ये भगवंतांनी हेच मन भक्ताकडून मागितले आहे.

क्षेत्रामध्ये 'इच्छा, द्वेष, सुख, दुःख' हेही येतात. माणसामध्ये इच्छा का निर्माण होते ? इच्छा म्हणजे काय ? वस्तूचे आकर्षण आपल्यात आहे. वस्तूचे आकर्षण व अपूर्णता या दोन गोष्टींमुळे मेंदू उद्दीपित होतो, त्याला इच्छा म्हणतात. इच्छा म्हणजे एक चित्तवृत्ती ! इच्छा जेव्हा तीव्रतम होते, तेव्हा तिला 'काम' म्हणतात. ती जेव्हा बेचैनी, अस्वस्थता निर्माण करते, तेव्हा तिला 'राग', 'आसक्ती' असे म्हणतात. 'मला अमुक एक पाहिजे' ही इच्छा आणि 'मला नको' हा द्वेष. तिरस्कार, घृणा, धिक्कार ही द्वेषाची विविध रूपे आहेत. इच्छा-द्वेष नाहीसे करायचे तर, 'मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय....' भगवंताला मन-बुद्धी द्यायची, म्हणजेच इच्छा, द्वेष यांचे शुद्धीकरण करायचे. सर्वच महापुरुषांचे सांगणे आहे की, अंतःकरणशुद्धी हा भक्तीचा पाया आहे. भगवंताचे आपण अंश असल्याने स्वरूपतः आपण त्याच्याप्रमाणे नित्य, शुद्ध, बुद्ध, सच्चिदानंद असेच आहोत. पण मन-बुद्धी-चित्त-अहं यांच्यातील विकार-विषयांच्या मलिनतेमुळे आपण ईश्वरापासून वेगळे झालो आहोत.

मनाला जे अनुकूल वाटते व प्रसन्न करणारे असते, ते मिळाल्यामुळे होणाऱ्या अनुभवाला सुख म्हणतात आणि नको असणारी गोष्ट भोगावी



लागली असता जो अनुभव येतो, ते म्हणजे दुःख. इच्छेच्या पूर्तीने सुख होते; तर इच्छा पूर्ण न होण्याने दुःख होते. पण या प्रकारे आपल्या इंद्रियांच्या विषयांशी संयोग झाल्यामुळे मिळणारे सर्व सुख अस्थायी असते. अर्थातच त्याचा अंत दुःखातच होतो. म्हणून ज्ञानी माणसे त्यात रमत नाहीत.

'संघात' म्हणजे जुळणी ! शरीर व इंद्रियांची परस्परानुकूलता याला 'संघात' म्हणतात. भगवंतांनी शरीरात परस्परानुकूलता ठेवलेली आहे. पायाला दगड टोचला तरी डोळ्यांतून पाणी येते व बर्फाची शीतलता स्पर्श केली, की डोळ्याला, मनाला सुखद वाटते. कानांना दुःखद बातमी ऐकायला मिळाली, की डोळ्यांतून अश्रू येतात, बुद्धीत खिन्नता येते. अशी परस्परानुकूलता या क्षेत्रात सामावलेली आहे.

'चेतना' म्हणजे प्राणशक्ती! चेतना हा शब्द या ठिकाणी 'चैतन्य' या अर्थाने वापरलेला नाही. चेतना म्हणजे जड देहात दिसून येणारी हालचाल, चेष्टा किंवा जिवंतपणाचा व्यापार एवढाच अर्थ येथे विवक्षित आहे. ज्या चिच्छक्तीने जडात ही हालचाल किंवा व्यापार उत्पन्न होतो, ते 'चैतन्य' होय. शरीरातून चेतना नष्ट झाली म्हणजे जड देह शिल्लक असूनही तो काही करू शकत नाही.

'धृति' म्हणजे धैर्य! पाण्याला अग्नी नाहीसा करतो, त्याप्रमाणे पाचही महाभूते (पृथ्वी, जल, अग्नी, आकाश, वायू) एकमेकांना सहन करीत नाहीत; पण असे असूनही देहाच्या ठिकाणी ती महाभूते एकोप्याने वागतात. आपआपल्या गुणाने एकमेकांचे पोषण करतात. ज्याच्या योगाने हे घडते, त्या तत्त्वाला 'धृति' असे म्हटले आहे.

याप्रमाणे क्षेत्राचे सविस्तर वर्णन सांगितले गेले. रथाच्या सर्व भागांच्या समुदायाला ज्याप्रमाणे 'रथ' म्हणतात, त्याचप्रमाणे ही ३१ तत्त्वे मिळून क्षेत्र बनतात. म्हणून या शरीराला कौतुकाने 'क्षेत्र' म्हटले आहे. खरे म्हणजे परब्रह्माच्या अलीकडे व स्थावराअखेरपर्यंत धरून त्या दोहोंच्या दरम्यान जे जे काही उत्पन्न होते व नाश पावते ते सर्व क्षेत्रच होय ! क्षेत्र-क्षेत्रज्ञ-विचाराने 'क्षेत्र' म्हणजे काय आणि 'क्षेत्रज्ञ' कोण याचा बोध होतो.

प्रकृतीच्या रूपात परमात्म्याची माया किंवा शक्तीचे सर्वत्र जे प्रकटीकरण दिसते ते सर्व क्षेत्र होय.

मनुष्याच्या संदर्भात बोलायचे झाल्यास त्याच्या देहातील पंचमहाभूते, अहंकार, बुद्धी, मन, इंद्रिये व त्यांचे विषय तसेच इच्छा, द्वेष, सुख-दुःख इ. मनोभाव हे 'क्षेत्र' या संज्ञेत अंतर्भूत आहेत. आणि 'क्षेत्रज्ञ' म्हणजे क्षेत्र

जाणणारा म्हणजे क्षेत्राचा मालक. तो स्वयं परमात्मा होय. देहामध्ये स्थित आत्मा हा परमात्म्याचाच अंश असतो.

अध्यात्मात प्रगतीसाठी क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्यामधील भेदाचे स्पष्ट ज्ञान होणे अत्यंत जरुरीचे आहे. ते झाल्यावर अनित्य देहासंबंधी अलिप्ततेची भावना होते व परमात्म्याशी जोडून जाऊन आपल्या मूळ परमात्म-भावात प्रवेश करणे शक्य होते. तेव्हा हे 'ज्ञान' काय आहे, त्याचे लक्षण कोणते, हे आता भगवान स्पष्ट करीत आहेत.

**अमानित्वमदंभित्वमहिंसा क्षांतिरार्जवम् ।**
**आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ।।७।।**
**इंद्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एव च ।**
**जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ।।८।।**
**असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु ।**
**नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ।।९।।**
**मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ।**
**विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ।।१०।।**
**अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् ।**
**एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ।।११।।**

"मान नसणे, दंभ नसणे, अहिंसा, क्षमा, सरळपणा, गुरुसेवा, शुचिभूर्तपणा, स्थैर्य, मनोनिग्रह." ।।७।।

"इंद्रियांच्या विषयांचे ठायी विरक्ती, तसेच अहंकार नसणे, आणि जन्म, मृत्यू, जरा, व्याधी व दुःख (हे आपल्यामागे लागलेले) दोष आहेत अशी बुद्धी असणे." ।।८।।

"अनासक्ती, बायकामुले व घर इत्यादिकांत आसक्त न होणे, इष्ट किंवा अनिष्ट प्राप्त झाले, तरी नेहमी चित्ताची एकसारखी वृत्ती असणे." ।।९।।

"आणि माझ्या ठायी अनन्यभावाने न ढळणारी भक्ती, 'विविक्त' म्हणजे निवडक किंवा एकांत जागी राहणे, सामान्य जनांचा समुदाय न आवडणे." ।।१०।।

"अध्यात्मज्ञान नित्य आहे अशी बुद्धी होणे व तत्त्वज्ञानाच्या सिद्धान्तांचे परिशीलन यांस ज्ञान म्हटले आहे. यांखेरीज जे दुसरे ते अज्ञान होय." ।।११।।

वरील पाच श्लोक हे कल्याणकारी, महान व सारभूत श्लोक आहेत. इथे ज्ञानाची व्याख्या केली आहे. वरील श्लोकांत उद्धृत केलेले गुण किंवा लक्षणे मनुष्याच्या ठायीं दृष्टीस पडू लागली म्हणजे त्याला ज्ञान झाले असे म्हणावे. ज्ञान जेव्हा हृदयात प्रतिष्ठित होते, तेव्हा ते इंद्रियांच्या क्रियेवरून डोळयांनाही दिसते. वसंतऋतूचे आगमन झाले की, वृक्षवेली जशा बहरून येतात, त्याप्रमाणे ज्ञानवान पुरुषांची इंद्रिये ज्ञानाचे अस्तित्व दाखवितात, देहाच्या ठिकाणी ती लक्षणे उमटतात व तशी कृती ज्ञानी मनुष्यांकडून होत राहते. वेदान्तात 'ज्ञान' शब्दाचा अर्थ जाणणे, आकलन होणे एवढाच नसून ईश्वरानुभव किंवा अद्वैतानुभव असा आहे. गीताकार सांगतात की, हे देहरूप 'क्षेत्र' म्हणजे शेत फुलविण्यासाठी यात ज्ञान पेरायचे आहे.



जे पेरायचे आहे, ते बाहेर नाही. आत अंतःकरणातच बदल करायचा आहे. भक्तीत बाह्य-विषय बंद करून फलप्राप्ती होणार नाही. त्यासाठी अहं, चित्त इ. आंतरिक गोष्टींचे शुद्धीकरण झाले पाहिजे. हे सांगण्यासाठी 'अमानित्वम्'पासून 'तत्त्वज्ञानार्थदर्शनम्' हे उच्च गुण भगवंतांनी सांगितले आहेत. हा सर्व मानसिक, बौद्धिक व आत्मिक विकास आहे.

'अमानित्वम्'चा सामान्य अर्थ 'मानाची अपेक्षा ठेवू नका' हा आहे. मनुष्य मानाची अपेक्षा दोन कारणांमुळे ठेवतो. जगात जे दुसऱ्याजवळ नाही, ते माझ्याजवळ आहे अशा कल्पनेने मानाची अपेक्षा करतो. ज्ञान, सत्ता, संपत्ती, पद, अधिकार, गुण, वैभव इ. माझ्याजवळ आहे, म्हणून मला मान द्या असे त्याला वाटते. दुसरे हे की मी काही निर्मिती केली आहे, त्यात माझे कर्तृत्व आहे, तोच कर्तृत्वाभिमान माणसाला मान मागायला प्रेरणा देतो. हा अहंकार, कर्तृत्वाभिमान व ही स्वामित्वाची भावना गेली तरच 'अमानित्व' येते. ही भावना ज्यामुळे कमी होते ते ज्ञान. 'मी करतो,' 'माझ्यामुळे हे घडते,' 'मी नसतो तर हे झाले नसते,' माझ्यामुळेच प्रपंच आहे' इ. वाक्ये ही या कर्तृत्वाभिमानामुळेच तोंडात येतात. प्रत्येक लहानसहान गोष्टीमध्ये आपला 'अहं' आपण प्रकट करीत असतो. वास्तविक माझ्याजवळ जे आहे, ते माझ्या शक्तीचे नाही हा बोध सतत झाला पाहिजे. भगवंताची कृपा नसेल, तर हे कर्तृत्व माझ्या हातून झालेच नसते ही भावना ठेवून कर्तृत्व भगवंताला अर्पण केले, तरच 'अमानित्व' येईल. मला जी जी शक्ती मिळाली, ती सर्व भगवंताचाच प्रसाद आहे. माझा अधिकार फक्त त्याचा सदुपयोग करण्यापुरता मर्यादित आहे, अशी जाणीव ठेवली, तर मानाची अपेक्षा राहणार नाही. मान म्हणजे लोकेषणा ! सामाजिक मान्यता !! ही लोकेषणा एकदा मागे लागली की, अधोगती सुरू झालीच, असे समजायचे.

कारण लोकांना आवडेल तसेच देण्याचा त्याचा हव्यास सुरू होतो. सामाजिक मान्यतेपेक्षा भगवंताची मान्यता मिळावी, अशी कृती हातून घडली की, 'अमानित्व' आले असे समजावे. मानाचीच अभिलाषा असेल, तर प्रभुस्पर्शाचा मान मिळविणे हाच खरा सन्मान. 'अमानित्व' ही एक वृत्ती आहे. संपूर्ण विश्व हे माझे घरच आहे, मला कोणी परका नाही, अशी विश्वबंधुत्वाची वृत्ती निर्माण झाली की, मानाची अपेक्षा राहत नाही. हा खरा आध्यात्मिक विकास आहे. मानाच्या अपेक्षेने केलेली कृती ही हिणकस असेच समजावे.

ज्ञानासाठी 'अमानित्व' हे पहिले लक्षण प्रभूंनी ह्या श्लोकात सांगितले. आता दुसरे लक्षण 'अदंभित्वम्' म्हणजे दंभाचा अभाव. लोकेषणा जोपर्यंत आहे, तोपर्यंत माणसाचे ठिकाणी दंभ राहणारच. ही लोकेषणा कशी जाणार? माणसाला दुसऱ्याने प्रशंसा करावी, कोडकौतुक करावे, असे जोपर्यंत वाटते तोपर्यंत दंभ राहणार. पण खऱ्या अर्थाने जर आत्मसंतुष्टता आली, तर कोणी वंदो अथवा निंदो, आपले कर्तव्य आपण करायचे या भावनेने तो समाजात वावरतो. अशा माणसात स्व-कर्तृत्वाबद्दल आत्मविश्वास व निःस्पृहता असते. संपूर्ण जगाने जरी त्याला अव्हेरले तरी तो तसूभरही ढळत नाही. 'ॐ पूर्णमदः पूर्णमिदं' - मी पूर्ण आहे'' या जाणिवेने तो कार्यरत राहतो. अशी पूर्णत्वाची जाणीव आली की, लोकेषणा जाते. एकदा अदंभित्व आले की, मग तो ज्ञानाचा टेंभा मिरवीत नाही, दानाचे कौतुक करीत नाही, केलेल्या उपकाराची परतफेड मागत नाही, कर्तृत्वाचा डांगोरा पिटत नाही.

'अहिंसा' म्हणजे केवळ कोणाची हिंसा न करणे नव्हे. अहिंसा ही एक वृत्ती आहे. ती मनातच उत्पन्न होते. एकदा का ही वृत्ती मनामध्ये बळावली म्हणजे तीच इंद्रियव्यापारातून दिसून येते. अहिंसा म्हणजे प्रेमदृष्टी! सर्व प्राणिमात्रांविषयी आत्मीयता वाटायला लागली की, अहिंसा दृढ होते. 'आत्मौपम्य' दृष्टीने जगाकडे पाहायला लागले की, ही दृष्टी येते.

'क्षान्ति' म्हणजे सुखदुःख सहन करीत असताना टिकणारी मनःशांती. आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक हे तीन प्रकारचे ताप एकाच वेळी जरी अशा माणसावर कोसळले, तरी त्याची मानसिक अवस्था ढळत नाही. सर्वच स्थितीत तो स्थिर, अचंचल, सम राहतो. सुखदुःखे ही त्याच्या ठिकाणी सारखीच मानली जातात. निंदेने अथवा स्तुतीने त्याच्या मनाची द्विधा अवस्था होत नाही. दुसऱ्याने त्याचा अपराध केला असता, त्याच्या चित्तात यत्किंचितही क्रोधाची ऊर्मी उठत नाही. त्याच्या मनात नेहमी क्षमा, करुणा व सर्वांच्या हिताची इच्छाच वास करते.



'आर्जवम्' म्हणजे सरळपणा ! सूर्याचा प्रकाश जसा सर्वांना सारखाच मिळतो, आकाशाचे छत्र जसे सर्वांना लाभते, तसे त्याचे मन सर्वांच्या ठिकाणी सारखेच असते. तो आत्मानुभवात तृप्त राहतो. त्याची दहाही इंद्रिये सरळ, निर्मळ असतात. अशा माणसात विषयासक्ती संशय व लोभ राहत नाही, त्याचे विचार व आचरण सरळ असते.

'आचार्योपासनम्' म्हणजे गुरुपूजन ! गुरू हीच देवता, गुरूच माता, गुरूच पिता. गुरू हे ज्याचे सर्वस्व, विनम्र बुद्धीने व अनाग्रही राहून तो गुरूकडून मार्गदर्शन प्राप्त करतो.

- भगवान श्रीकृष्णांनी गुरूचे माहात्म्य येथे सांगितले आहे. स्वतः श्रीकृष्ण सांदिपनी ऋषींच्या आश्रमात अल्पकाळ राहिले होते. गुरूकडे राहून त्यांना विनम्रतेने प्रश्न विचारून व त्यांना शरण जाऊन ज्ञान प्राप्त करावे हे भगवंतांनी चौथ्या अध्यायात आधीच सांगितले आहे. अवतार स्थितीत सुद्धा योग्य मार्ग दाखविण्यासाठी गुरूची आवश्यकता असते. अशा गुरूंची उपासना करून, त्यांची सेवा करून ज्ञान प्राप्त करावे हे गीतेचे सांगणे आहे. असा गुरू आपल्या जीवनात कोणत्या क्षणी व कोणत्या प्रसंगातून प्राप्त होईल हे अनाकलनीयच असते, पण जेव्हा प्राप्त होतो त्या वेळी ''हृदया हृदय एक जाहले'' अशी अवस्था होते.

अष्टावक्र जेव्हा जनकराजाच्या दरबारात आले त्या वेळी सर्वजण त्यांच्याकडे पाहून हसले. आठ ठिकाणी वाकडेतिकडे असलेले शरीर पाहून त्यांना हसू आले. तेव्हा अष्टावक्र म्हणाले, ''मी तर ऐकले होते की राजा जनकाच्या दरबारात ज्ञानी-विद्वान आहेत. इथे तर केवळ शरीरावरची चमडी जाणणारे लोक आहेत.'' हे ऐकून सर्वजण अवाक् झाले. राजा जनक अष्टावक्रना म्हणाले की, ते सर्व विद्वानांचा अपमान करीत आहेत. त्यावर पुन्हा अष्टावक्र म्हणाले, ''हे राजा, नदी वाकडी-तिकडी असते, पण पाणी तसे नसते. शरीर वाकडे-तिकडे असते पण आत्मा तसा नसतो. त्या शरीरात असलेले ज्ञान तसे नसते. म्हणून शरीराकडे न पाहता ज्ञानाकडे पाहावे. निदान ज्ञानी व्यक्तींनी ज्ञानाची चर्चा करावी. वरच्या शरीराकडे पाहून ही चर्चा कशी होणार ?'' जनक राजाने आपल्या पत्नीला बोलावले व म्हणाले, ''हे बघ, आपण आतापर्यंत गुरूची प्राप्ती करण्यासाठी वन, अरण्ये, तीर्थे पालथी घातली पण गुरू आढळले नाहीत, परंतु आज तेच स्वतः आपल्या दरबारात आले आहेत हे आपले महान भाग्य आहे.'' एवढे बोलून राजाने त्यांचे पाय धरले. शरणागत होऊन त्यांची क्षमा मागितली. राजाच्या या वागण्याने सर्वांना आश्चर्य वाटले. साशंक नजरेने पाहणाऱ्या

विद्वानांना राजा जनक म्हणाले, ''मी आजपर्यंत ज्या ज्या व्यक्तीची पारख केली त्यात कुठेही चुकलो नाही व आज मी गुरूला ओळखले आहे. ते माझे निश्चित कल्याण करतील.'' आणि घडलेही तसेच. एक दिवस राजा जनक घोड्यावर बसत असताना अष्टावक्रांनी त्यांच्यावर कृपेचा वर्षाव केला. अष्टावक्रांनी आपल्या या शिष्याला तीन दिवस समाधी अवस्थेत ठेवले. समाधीतून राजा जनक जेव्हा बाहेर पडले त्या वेळी अष्टावक्र म्हणाले, "राजा, जे काही द्यायचे होते ते मी तुला देऊन टाकले आहे. ते केव्हा द्यायचे याची मलाही कल्पना नव्हती, पण आज ती वेळ आली आणि मी प्रसन्न झालो." सद्गुरू शिष्यावर केव्हा व कसे प्रसन्न होतील हे सांगता येत नाही. शिष्याने गुरूची सेवा करीत निष्ठेने त्यांची उपासना करावी. गुरूला शरण गेलेल्या शिष्याचे कल्याण नक्कीच होते.

'शौचम्' म्हणजे शुद्धत्व ! कापूर जसा आत-बाहेर निरभ्र, स्वच्छ असतो तसे, ज्याचे शरीर व अंतःकरण शुचित्वाने भरलेले असते, तेथे 'शौचम्' वास्तव्य करते. त्याचे मन विकाररहित होऊन तो रागद्वेष व तृष्णा यांच्या पलीकडे जातो.

'स्थैर्यम्' म्हणजे न ढळणारे स्थैर्य ! अचंचलता !! जो भय व शोक यांनी कंपित होत नाही, सुखदुःखांच्या लाटांनी जो वाहवत नाही, निंदा व स्तुती यांनी चंचल होत नाही, काम व लोभ ज्याला मोहित करीत नाहीत, अशी स्थिरचित्त, धैर्यवान, सहनशील स्थिती म्हणजे स्थैर्य.

'आत्मविनिग्रह' म्हणजे अंतःकरणनिग्रह ! चित्त व चैतन्य यांच्या समरसतेने जो अंतर्मुखतेत रममाण होतो, मनरूपी महाद्वारात, जो यम व दम यांस उभे जागे ठेवतो, जो इंद्रियांना काम-लोभ, विषय-विकार यांपासून सजग ठेवतो, त्याच्या ठिकाणी आत्मविनिग्रह वास करतो.

आठव्या श्लोकात 'इन्द्रियार्थेषुवैराग्यम्' हा गुण सांगितला. इन्द्रियांचे विषय मनुष्याला सतत भुलवितात. मनात वासनांची जळमटे दबा धरून बसलेली असतात. जन्मजन्मांतरींच्या संस्कारांची पुटे चढल्यामुळे आत्मदर्शन दुर्लभ असते. ही वासना-विकारांची, विषयभोगांची अवस्था माणसाचा आत्मविकास घडवू देत नाही. या विषयांना भोगून व वासनातृप्ती करून मगच मन शांत होईल आणि त्यानंतर आत्मलाभासाठी साधना करू अशी जर जीवाने इच्छा केली, तर ती केवळ त्याची भ्रांती ठरेल. कारण अग्नीत जसे तूप ओतावे आणि अग्नी भडकावा, तसे एका इच्छातृप्तीतून दुसरी इच्छा निर्माण होत असते. वासनेची ही अखंड, अतृप्त अशी मालिका खंडित करायची असेल, तर मनात ज्ञानाचा जन्म व्हावा लागतो व हे ज्ञानच



मनाला विकार-वासनांपासून दूर ठेवू शकते. म्हणून भगवंत म्हणतात की, या ज्ञानप्राप्तीसाठी इंद्रियांचे विषयांप्रत वैराग्य आले पाहिजे. ३०० वर्षे सतत भोग भोगूनदेखील ययाती तृप्त झाला नाही. शेवटी ययाती म्हणाला, ''माझे शरीर शिथिल झाले, पण मन मात्र अशांतच राहिले.'' मनुष्याचे वयानुसार शरीर व गात्रे शिथिल होतात, पण वासना क्षीण होत नाहीत. मनात वैराग्य जागेल, तेव्हाच ज्ञानाचा उदय होईल.

- नश्वर देहाची व परिवर्तनीय जगाची वास्तवता जसजशी समजायला लागते, तसतसे हे ज्ञान वाढायला लागते. इंद्रिये ही भल्या भल्या विद्वानांना सुद्धा जेरीस आणतात. परमार्थात मनुष्य प्रगतीचे सोपान चढायला लागला की; मायादेखील आपली शक्ती, प्रभाव दाखवायला लागते. परमार्थात खूप प्रगती केलेले साधक, अशा मोहमायेत पुरते फसतात व उंच टेकडीवरून एखादा धोंडा जसा वेगाने घसरत पायथ्याला पोहोचतो तसे हे साधक मूळ स्थितीला येतात. म्हणून वैराग्य अंगी बाणणे हे परमार्थप्राप्तीचे पहिले साधन आहे. वासनांवर नियंत्रण आणल्याशिवाय हे शक्य नाही. मनुष्याचे शरीर वृद्धत्वाने विकलांग होते पण अशा गलितगात्र शरीरातसुद्धा वासना जीर्ण होत नाही. वाढत्या वयाबरोबर वासनासुद्धा आपले भयंकर रूप दाखवायला लागते. इंद्रिये शिथिल होतात पण वासनेचे रूप यौवनाचे असते. वासनाक्षय होण्यासाठी वैराग्य दृढ झाले पाहिजे.

शुकदेवमुनीने परीक्षित राजाच्या मनात वैराग्य निर्माण करण्यासाठी एक वैराग्यपूर्ण कथा सांगितली की, ज्यामुळे त्याच्या मनातील भोगविषयांचे आकर्षण कमी होईल. कथा मोठी मार्मिक आहे. ''एक राजा होता. शिकारीनिमित्त जंगलात गेला असताना प्रचंड वादळवाऱ्यात सापडला. पाऊस झोडपत होता. अशा संकटसमयी त्याला एक झोपडी दिसली. त्या झोपडीजवळ राजा गेला, तेव्हा त्याला झोपडीतून दुर्गंध येत असल्याचे जाणवले. जेव्हा त्याने आत डोकावले तेव्हा तिथे मल-मूत्र, हाडे व कातडी टांगत ठेवलेली दिसली. पण दुसरा काहीच मार्ग नव्हता म्हणून त्याने झोपडीतील शिकाऱ्याला हाक मारली. राजा त्याला म्हणाला, ''तुझ्या झोपडीत दुर्गंधच दुर्गंध आहे, पण आत येण्याशिवाय दुसरा काही उपाय नाही. तू मला यापेक्षा काही चांगले ठिकाण देऊ शकशील का?'' तो शिकारी म्हणाला,''तू एकवेळ माझ्या झोपडीत ये. एक रात्र तू येथे राहा. मला खात्री आहे की, तुला माझी झोपडी एवढी आवडेल की तू येथून जाण्याची इच्छाच करणार नाहीस,'' राजा म्हणाला, ''तू मूर्ख आहेस. स्वर्गात राहणाऱ्याला नरक आवडेल का?'' पण शिकाऱ्याने ठाम निश्चयाने सांगितले व राजाला एक रात्र तरी राहण्याचा

आग्रह केला. रात्री राजा झोपडीत राहिला. सुरुवातीला बेचैन होता, पण नंतर गाढ झोप लागली. सकाळी उठल्यावर राजा आपल्या नगरीलाही विसरला. परीक्षित राजाने ही गोष्ट ऐकली, व तो म्हणाला,''महाराज, हे कसे काय शक्य आहे? आपल्या सुंदर राजमहलाला विसरून अशा झोपडीत राहणारा असा मूर्ख राजा कोठे असेल का?'' शुकदेवमुनी हसत हसत म्हणाले,''तूच तो मूर्ख राजा आहेस. दुसरा कोणी नाही. त्या मल-मूत्राच्या दुर्गंधीची झोपडी म्हणजे तुझे शरीरच आहे; जी स्वर्गनगरी तुझे मूळचे स्वरूप आहे तेथे न जाता, तू या शरीराच्या भोगविलासात रुतून पडला आहेस. आणि तेच नरकमय जीवन तुला आवडायला लागले आहे. वैराग्याची तू आठवणच काढत नाहीस.'' हे ऐकल्यावर परीक्षित राजा ओशाळला. बुद्धीत ज्ञानाचा प्रकाश पडला. मृत्यूचे खरे स्वरूप समजले. भीती निघून गेली. ज्ञान आले की वैराग्यही येते.

भगवान श्रीकृष्णाने जीवनातील ह्या अंतिम सत्याची जाणीव इथे करून दिली आहे. प्रत्येक संयोगाला वियोग आहे. प्रत्येक संग्रहाला विग्रह आहे. जे जोडले आहे ते कधीतरी सोडावेच लागणार आहे. जे प्राप्त केले आहे ते धन, गृह, प्रपंच असे सर्वच एक दिवस सोडून जावे लागणार आहे. ज्याने जन्म घेतला आहे त्याला मृत्यूला कवटाळावे लागणार आहे. शरीर त्याच्या मालकीचे होते, आपण ते फक्त वापरले. कृतज्ञतेने व इच्छेने ते दे अगर न दे पण ते शरीर त्याचे त्याला द्यावे लागणार आहे. हे जर असे आहे तर या सर्वांविषयी इतके ममत्व व आसक्ती का ठेवावी? ''मी'' व ''माझे'' हा अहंकार ठेवून का दुःखी व्हावे? जन्म व मृत्यू या दोन्ही गोष्टींत मनुष्य पराधीन आहे. त्या जर अटळ असतील तर त्याचा प्रसन्नतेने स्वीकार करण्यातच पुरुषार्थ आहे. प्रपंचाचे हे वास्तव ज्ञान वृत्तीत आणले तरच वैराग्य निर्माण होईल. अशा वैराग्याशिवाय मिळालेले ज्ञानदेखील अपूर्ण आहे. म्हणून भगवंतांनी गीतेत, मनुष्याला त्याचे खरे स्वरूप पुनःपुन्हा समजावून दिले आहे. सर्व काही बदलेल पण मनुष्याचा आत्मा बदलणार नाही. कारण तो भगवंताचा अंश आहे. अंश हा अंशीपासून वेगळा कसा राहील? म्हणून या आत्म्याला परमात्म्याशी जोडण्याचा प्रयत्न केला पाहिजे. मनुष्यजन्माचे सार्थक यातच आहे. आनंद हे आपले स्वस्वरूप आहे. तरीही अज्ञानाने व अविद्येने आपण दुःखी झालो आहोत. वैराग्य आले तर हे अज्ञान दूर होईल. ''ज्ञानस्य पराकाष्ठा वैराग्यं'' - आपले स्वरूप समजून घेतले तर वैराग्य जागे होईल.

यासाठी भगवंत नंतर 'अनहंकार' हा गुण सांगत आहेत. जीवनात



'मी' 'माझे' या अहंवृत्तीचा त्याग करणे म्हणजे वैराग्य प्राप्त होणे होय. अशी अनहंकारी वृत्ती होणे म्हणजे ज्ञानाची अवस्था येणे असे भगवंताचे सांगणे आहे. कोणत्याही वस्तूच्या ठिकाणी असणारे ममत्व, आसक्ती हीच माणसाच्या दुःखाला कारणीभूत असते. या जगात मिळविलेली प्रत्येक वस्तू अखेरीस येथेच ठेवून जावी लागते. ह्या वस्तुस्थितीचे भान जेवढ्या लवकर होईल तेवढे ममत्व कमी होऊन अनहंकारी होणे शक्य आहे. या पृथ्वीवर राज्य करण्यासाठी सिकंदरासारखे महापराक्रमी राजे अगणित होऊन गेले. पण मृत्युसमयी मात्र रिक्तहस्ते त्यांना जग सोडावे लागले. 'कोहिनूर'सारख्या अनमोल हिऱ्यासाठी किती रक्तपात व संघर्ष करावा लागला हे सर्वश्रुतच आहे. अशा प्रसिद्ध हिऱ्यांचा चारशे-पाचशे वर्षांचा इतिहाससुद्धा आहे. हिरे येथेच राहिले, पण धारण करणारे मात्र नामशेष झाले. 'माझी जमीन', 'माझी संपत्ती', 'माझे कर्तृत्व', 'मी सत्तावान', 'मी धनवान'... असे 'माझे' व 'मी'पण जाणे म्हणजे ज्ञान प्राप्त होणे. असे जेव्हा घडत नाही, तेव्हा हे अज्ञान! मग अशी अज्ञानी माणसे 'अहंकाराच्या' हातचे बाहुले बनून प्रपंचात गटांगळ्या खात राहतात. अहंकार अज्ञानी माणसाला नाचवितोच; पण ज्ञानी माणसाच्या नरडीला झोंबून अधिकाधिक संकटात घालतो, असे ज्ञानेश्वर माऊली म्हणतात.

'जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम्' - ज्ञान म्हणजे जीवनात होणाऱ्या परिवर्तनाचे यथार्थ सत्यस्वरूप समजणे होय. जन्म व मृत्यू म्हणजे काय ? या जगात आपल्याला कोणी पाठविले ? येथून पुन्हा कोठे जायचे? इथे येण्याचा हेतू काय ? ह्या देहावर खरी मालकी कुणाची ? वृद्धत्व, व्याधी का येतात ? या जन्माची सार्थकता कशात आहे ?... अशा प्रश्नांवर माणूस जेव्हा विचार, चिंतन करायला लागतो, तेव्हा त्याच्या मनात वैराग्याचा अंकुर फुटायला लागतो. आणि नंतरच त्याला ज्ञानाची फळे येतात. राजकुमार सिद्धार्थाला अशाच विचारांनी घेरले. त्याने काही दृश्ये पाहिली व जीवनातील कठोर सत्य त्याला उमगले. त्याने एकदा एका पूर्ण वाकलेल्या वृद्धाला पाहिले आणि सारथ्याला याचे कारण विचारले. सारथी म्हणाला, "वृद्धत्व आले की शरीराची ही अवस्था होते. इंद्रिये कुचकामी होतात व गात्रे शिथिल पडतात." त्यानंतर त्याने एक प्रेत पाहिले. पुन्हा तोच प्रश्न ! सारथ्याने उत्तर दिले, "त्याच्या शरीरातून आत्मा निघून गेला आहे. त्यामुळे त्या चैतन्यहीन शरीराला दहन करण्यासाठी लोक घेऊन जात आहेत." सिद्धार्थांना यातूनच वैराग्य प्राप्त झाले. कठोर साधनेने जीवनाचे रहस्य त्यांनी शोधून काढले आणि म्हणून राजकुमार सिद्धार्थ गौतम बुद्ध... 'ज्ञानी'

झाले. मनुष्य-जीवनाची ही कहाणी सहा टप्प्यांची आहे. अस्ति, जायते, वर्धते, विपरिणमते, अपक्षीयते व विनश्यति ! अशा रीतीने या देहाचा जन्मापासून मृत्यूपर्यंतचा प्रवास आहे. जन्म, मृत्यू याबरोबरच शरीराच्या व्याधीही आहेत. कोणत्या क्षणी कोणती व्याधी या देहाला होईल याची आपल्याला कल्पनाही नसते. या सर्वच गोष्टी अटळ आहेत. म्हणून भगवंत पुढे म्हणतात, 'दुःख-दोष-अनुदर्शनम्'

....जीवनात जी दुःखे येतात त्यांचे स्वरूप समजायला हवे. शरीरात होणाऱ्या या परिवर्तनाचे ज्ञान झाले म्हणजे माणूस मोहग्रस्त होऊन संसारात आसक्त होत नाही. हे यथार्थ ज्ञान जेवढे लवकर होईल तितक्या लवकर मुमुक्षुत्व येऊन तो अंतिम सत्याजवळ जाण्याचा प्रयत्न करील. या जगात प्रेम, भक्ती करण्यास पात्र केवळ परमेश्वर आहे. जीव हा परमेश्वराचाच अंश आहे. त्याच्याशी अद्वैत साधणे यातच या जन्माचे सार्थक आहे. हे समजणे म्हणजे ज्ञान!

पुढे नवव्या श्लोकात भगवंत सांगतात की, 'असक्तिः अनभिष्वङ्ग पुत्रदारगृहादिषु'.... म्हणजे अनासक्त हो. पुत्र, पत्नी, घर यासंबंधी हाव धरू नकोस. विचाराने, विवेकाने आपले कर्तव्य पार पाडत जायचे; पण प्रपंचात सर्वस्वी गुंतायचे नाही. 'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन'– निष्काम भावाने कर्तव्य म्हणूनच आपले कर्म करायचे. गीता प्रपंच सोडायला सांगत नाही. प्रपंच समजून केला पाहिजे व तो कसा करावा आणि त्यातून कसे सुटावे याचे यथार्थ ज्ञान गीता देते. मोहग्रस्त अर्जुन म्हणजे प्रपंचात बद्ध झालेले आपणच सर्वजण आहोत. कर्तव्यपराङ्मुख न होता, पद्मपत्राप्रमाणे प्रपंचात राहायला गीता शिकविते. जोपर्यंत माणूस पुत्र, पत्नी, घर यांत मोह, ममता, आसक्ती ठेवून राहतो तोपर्यंत वैराग्य त्याच्यापासून दूर राहते. जिथे वैराग्य नाही, तिथे ज्ञान कसे येणार ? प्रपंचात प्रेम, उत्कटता जरूर असावी. याशिवाय जीवन अधुरे आहे, हे निश्चित. पण वाढत्या वयाबरोबर ही आसक्तीही कमी व्हावी. म्हणूनच आपल्या भारतीय जीवनपद्धतीमध्ये चार आश्रमांची योजना केली होती. सर्व मोहपाश दूर ठेवून, तप करण्यासाठी वानप्रस्थाश्रमाची व्यवस्था होती. तीर्थयात्रा करून तीर्थाच्या ठिकाणी आवडणारी, सर्वात प्रिय वस्तू सोडण्याची, त्यागण्याची परंपरा होती. हेतू एवढाच की, प्रपंचातून वर उठावे; समर्पण, विरक्ती यांची सवय व्हावी. म्हणजे शरीर सोडताना केवळ भगवंताचे स्मरण असावे. कारण शेवटी 'जशी मती तशी गती'.

'नित्यम् समचित्तत्वम् इष्टानिष्टोपपत्तिषु' हेही ज्ञानाचे मोठे लक्षण



आहे. जीवनात नेहमीच इष्ट-अनिष्ट, चांगले-वाईट, भद्र-अभद्र, सुख-दुःख, लाभ-हानी अशी द्वंद्वे येत असतात. अशा सर्व अवस्थांमध्ये जो चित्ताचे समत्व व मनाचे संतुलन सांभाळतो, तो ज्ञानी आहे असे समजावे. कोणी वंदो कोणी निंदो, यश मिळो अथवा अपयश, धन मिळो अथवा न मिळो... अशा दोलायमान अवस्थेमध्येसुद्धा ज्याच्या मनाची शांती, स्थिरता ढळत नाही, तिथे ज्ञानाचा उदय झाला असे मानावे. अशा मनुष्याच्या अंतःकरणात सदैव प्रसन्नता असते. आशा-निराशेच्या हिंदोळ्यावर त्याचे मन विचलित होत नाही. कारण असे की 'मन के हारे हार है, मन के जीते जीत.' असे अविचल मन सदैव यशाच्या वाटेवरच राहते. असे मन सुखाने हुरळून जात नाही व दुःखाने होरपळत नाही. यश आले तरी अहंकार, अभिमान शिवत नाही व अपयश आले तरी खचून जात नाही.

मनासारखे घडले तरी भगवंताची कृतज्ञता व मनासारखे घडले नाही तरी त्याचीच कृपा मानायची. कोणत्याही स्थितीत समत्व साधायचे व आतून सतत शांत, स्थिर राहायचे म्हणजे हे समचितत्व वृत्तीत आले असे समजावे. प्रपंचात अनेक गोष्टी मनासारख्या घडत नाहीत. पती-पत्नीत, पिता-पुत्रात सुसंवाद असेल तर घरात सुख, स्वास्थ्य मिळते; पण व्यक्ती-व्यक्तीत विसंवाद व स्वभावाची भिन्न टोके असतील तर ते सर्वांनाच क्लेशदायक ठरते. घरातील सुख घराच्या सजावटीत, ऐश्वर्यात नसते. वस्तूंच्या वैभवापेक्षा मनातील भाव संपन्न असेल तर तेथे आनंद दरवळतो. प्रत्येक व्यक्ती आपला 'अहं' विसरून दुसऱ्याच्या हिताचा विचार करू लागली की; आत्मीयता, जिव्हाळा वाढू लागतो. भोगापेक्षा त्यागातसुद्धा किती आनंद आहे याची प्रचिती यायला लागते. मनुष्य जेवढा आपला स्वतःच्या सुखाचा विचार करतो तेव्हा त्याच्या सुखालाही मर्यादा येते. पण सुखाचा हा परिघ जेवढा वाढवावा तेवढे सुखही वाढायला लागते. दुसऱ्याच्या सुखातसुद्धा, सुख शोधायला लागले की, हा परिघ वाढायला लागतो. एक वेळ दुसऱ्याच्या दुःखाने दुःखी होता येते पण दुसऱ्याच्या सुखाने सुखी होणे हे अतिशय कठीण आहे. ज्ञानाची ही सर्व लक्षणे आहेत. अशा नैतिक गुणांनी संपन्न होणे म्हणजेच ज्ञानी होणे. ज्ञान, धर्म, तत्त्वज्ञान या गोष्टी केवळ सांगण्याच्या, उपदेशिण्याच्या गोष्टी नाहीत. या गोष्टी आचरणात आणून तशी वृत्ती होणे म्हणजे ज्ञान प्रतिष्ठित झाले असे समजायचे. जीवनात या सद्‌गुणांचा प्रभाव जेवढा वाढेल, तेवढे सद्ज्ञान तिथे अवतरते असा तो भाव आहे.

प्रपंचात कोणत्याही स्थितीत अविचल, समचित्त राहणे हा ज्ञानाचा मोठा गुण आहे; हा गुण अंगी आला की, व्यक्ती सहनशील होते; त्याची आत्मिक शक्ती वाढते. मग ज्या घरात तो राहतो तीच त्याची तपोभूमी ठरते. त्याची कुणाविषयी कसलीच तक्रार राहत नाही. आपल्या संतांनी हे सर्व आचरून दाखविले आहे. केवळ उपदेश केला नाही. अनुकूल, प्रतिकूल.. सर्व परिस्थितीत हे समचित्तत्व सोडले नाही. संत एकनाथांची पत्नी अत्यंत समंजस, परोपकारी, सहनशील व गृहकर्तव्यात आपल्या पतीला सौख्य देणारी होती. त्यामुळे संत एकनाथांचा परमार्थ सहज संपन्न झाला. याबद्दल त्यांनी भगवंताचे आभार मानले. संत तुकारामांना अत्यंत भांडखोर पत्नी लाभली. ज्या विठूरायाच्या भक्तीत तुकाराम सदैव देहभान विसरलेले असत, त्या विठ्ठलालासुद्धा दूषणे देण्यात त्यांच्या पत्नीने मागेपुढे पाहिले नाही. आक्रस्ताळेपणा करून परमार्थात सतत विघ्ने आणणे हा नेहमीचा खाक्या झाला होता, पण अशा पत्नीबद्दल संत तुकारामांनी कधीही तक्रार केली नाही. उलट परमेश्वराचे धन्यवाद मानले. एका अभंगात ते म्हणतात;

**"बरे झाले देवा बाईल कर्कशा।**
**बरी ही दुर्दशा जनामध्ये .........**।।३७।।

"हे देवा, कर्कशा बायको मिळाली हेही बरे झाले. या लोकांमध्ये माझी दुर्दशा झाली हेही बरे झाले."

अशा पत्नीमुळेच संसाराचा मोह कमी झाला. वैराग्य दृढ झाले, परमार्थाला बळकटी आली आणि विठोबाच्या चरणी प्रेम वाढले. असा श्री तुकारामांचा भाव होता. म्हणून अशी पत्नी दिल्याबद्दल त्यांनी भगवंताचे आभार मानले. गोस्वामी तुलसीदासांनीसुद्धा भगवंताचे असेच आभार मानले. त्यांच्या बाबतीत घटना मात्र वेगळी घडली. तुलसीदासांना पत्नीचा मोह अनावर होता. एकदा ती आपल्या माहेरी गेली असताना कामांध होऊन, तिला भेटण्यासाठी अनेक संकटांवर मात करून ते पत्नीच्या माहेरी आले तेव्हा पत्नी त्यांना म्हणाली, "जेवढे प्रेम, ध्यान, मोह माझ्या ठिकाणी आहे तेवढे जर भगवंताच्या ठिकाणी ठेवले असते तर मोक्ष मिळाला असता. जितके कामसुखासाठी कष्ट घेतलेत, तेवढे कष्ट आत्मसुखासाठी घेतले असते तर मुक्ती मिळाली असती." पत्नीच्या या शब्दांनी तुलसीदास अंतर्मुख झाले. भगवंताला शरण गेले व परमार्थातील अंतिम साध्य प्राप्त केले. अशी पत्नी दिल्याबद्दल त्यांनी परमेश्वराचे आभार मानले. नरसी मेहतांची पत्नी त्यांना अर्ध्यावरच सोडून गेली. तिचे देहावसान झाल्यानंतर नरसी मेहता



संसारातून पूर्ण विरक्त झाले. याही अवस्थेत त्यांनी भगवंताचे आभार मानले. चार संतांच्या चार वेगवेगळया कथा. पण सर्वांच्या कथेतील सूत्र एक. परिस्थिती इष्ट असो अथवा अनिष्ट, पण आपली सहनशीलता व मनाचा समतोल कधी ढळू दिला नाही. जी व्यक्ती ज्ञानाच्या अशा लक्षणांनी संपन्न व्हायला लागते, ती व्यक्ती सर्व प्रकारच्या परिस्थितीत आनंदी राहते. अशा लक्षणांनी त्याचे आत्मिक बळ वाढलेले असते.

१० व्या श्लोकात ज्ञानाचे लक्षण म्हणून 'अनन्ययोगेन भक्तिः अव्यभिचारिणी' हे सांगितले आहे. निरंतर योग व अव्यभिचारिणी भक्तीनेच ज्ञान फुलते. सकाम भक्ती ही गौण आहे. संकटाच्या वेळी भगवंताचे स्मरण ही भक्तीची प्राथमिक अवस्था. पण जो अनन्यभावाने भक्ती करतो, तो कोणत्याही अवस्थेमध्ये भगवंताला विसरत नाही. असा भक्त भगवंताला सर्व कर्मे समर्पित करून, शरणागत होऊन प्रेम, त्याग, सेवा अशा भावनेने सदैव त्याचे भजन, कीर्तन, पूजन करतो. असा अनन्यभक्त भगवंताकडे कधी तक्रार करीत नाही.

'विविक्तदेशसेवित्वम् अरतिः जनसंसदि' हे ज्ञानाचे पुढील लक्षण! साधनेसाठी भक्ताने एकांतस्थान शोधावे. जिथे केवळ भगवंताचेच स्मरण होईल, निसर्गाच्या शांत, प्रसन्न वातावरणात ध्यान-चिंतनासाठी स्थान असेल, तर तिथे अंतःकरणातील आतील आवाज ऐकावयास मिळतो. संसाराच्या रहाटगाडग्यातून, प्रपंचाच्या धकाधकीतून अशा निवांतस्थळी साधकाने महिन्यातून किमान पाच दिवस तरी जावे व असा अनुभव घ्यावा. ध्यान, साधना, पूजा, चिंतन यासाठी मनाला असे पोषक वातावरण द्यावे. म्हणूनच आश्रमांची जागा वनात असायची. चित्तैकाग्रता साधण्यासाठी हा एकांत आवश्यक असतो. अशा शांतीत, प्रसन्नतेत, आनंदात ज्ञान प्रसवते.

'अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम्' म्हणजे अध्यात्मज्ञानाचे नित्यत्व (अविनाशित्व) जाणणे आणि झालेल्या आत्मज्ञानाने परमात्म-साक्षात्कार होणे. परमात्मा म्हणून जे परम तत्त्व शास्त्राने सांगितले आहे, ते ज्या ज्ञानामुळे अनुभवाला येते, ते अध्यात्मज्ञानच खरे आणि तेच सर्व दुःखांतून पार करणारे ज्ञान होय, अशी दृढ श्रद्धा ठेवावी, आणि तत्त्वज्ञानाचा खरा अर्थ पाहावा म्हणजे ज्ञेय परब्रह्मापर्यंत जाणारी ज्ञानदृष्टी लाभावी.

गीताकारांनी ह्या सर्व वृत्तींना 'ज्ञान' संज्ञा दिलेली आहे. 'अमानित्वम्' पासून 'तत्वज्ञानार्थदर्शनम्'पर्यंत ज्ञानाची ही लक्षणे भगवंतांनी कथन केली. अशा ज्ञानसंवर्धक वृत्तींमुळे माणसाला ईश्वरानुभव येणे हेच गीतेमध्ये अभिप्रेत

आहे. केवळ बाह्य विषय सोडून नव्हे; तर अंतःकरणातील अहंकार, विषय, विकार आदींचा त्याग करून अंतर्बाह्य शुद्ध व पवित्र होणे म्हणजे ज्ञान प्राप्त करणे होय. 'एतत् ज्ञानं' ... आणि याच्या विरुद्ध जे काही आहे ते अज्ञान! अशी अज्ञानाचीदेखील व्याख्या इथे केली आहे.

या अध्यायात भगवान अर्जुनाला क्षेत्र, क्षेत्रज्ञ आणि क्षेत्र-क्षेत्रज्ञांतील भेद या तीन गोष्टी सांगू इच्छितात. मनुष्याच्या संदर्भात देह हेच 'क्षेत्र' आहे आणि देहस्थ आत्मा हा 'क्षेत्रज्ञ' अर्थात क्षेत्राला जाणणारा. क्षेत्र हे जड तत्त्व असून क्षेत्रज्ञ आत्मा चेतन तत्त्व आहे. परंतु आत्माही परमात्म्याचाच अंश असल्यामुळे खरा 'क्षेत्रज्ञ' परमात्माच आहे. आतापर्यंतच्या श्लोकात भगवंतांनी 'क्षेत्राविषयी' सांगितले तसेच 'ज्ञान' म्हणजे काय, तेही सांगितले. आता ते क्षेत्रज्ञ परमात्म्याविषयी सांगत आहेत. त्यालाच ते 'ज्ञेय' म्हणतात. कारण वास्तविक 'ज्ञेय' म्हणजेच परमात्म्याखेरीज जाणण्याजोगे इतर काहीही नाही. जाणल्यानेच सर्व काही जाणले जाते - ''यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम् । स सर्वविद्....'' (गीता - १५.१९). सातव्या अध्यायातही भगवंतांनी सांगितले आहे की, या विश्वात माझ्याशिवाय कोठेही काहीही नाही. ''मत्तः परतरं नान्यत् किंचिदस्ति धनंजय ।'' (गीता ७.७)

**ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वामृतमश्नुते ।**
**अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ।।१२।।**
**सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ।**
**सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ।।१३।।**
**सर्वेंद्रियगुणाभासं सर्वेंद्रियविवर्जितम् ।**
**असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ।।१४।।**
**बहिरंतश्च भूतानामचरं चरमेव च ।**
**सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चान्तिके च तत् ।।१५।।**
**अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् ।**
**भूतभर्तृच यज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ।।१६।।**
**ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते ।**
**ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य विष्ठितम् ।।१७।।**

''(आता) जे जाणिल्याने 'अमृत' म्हणजे मोक्ष मिळतो ते (तुला) सांगतो. (ते) अनादी, (सर्वांच्या) पलीकडले ब्रह्म होय. त्याला 'सत्' म्हणत नाहीत आणि 'असत्'ही म्हणत नाहीत.'' ।।१२।।

''त्याला सर्व बाजूंनी हातपाय आहेत. सर्व बाजूंनी डोळे, डोकी व



तोंडे आहेत. सर्व बाजूंनी कान आहेत. आणि तेच या लोकी सर्व व्यापून राहिले आहे.'' ।।१३।।

''(त्यात) सर्व इंद्रियांच्या गुणांचा आभास होणारा असून त्याला कोणतेच इंद्रिय नाही. ते अनासक्त असूनही सर्वांचे धारण करणारे आणि निर्गुण असूनही गुणांचा उपभोग घेणारे आहे.'' ।।१४।।

''(ते) सर्व भूतांच्या आत व बाहेरही आहे. अचर आहे व चरही आहे. सूक्ष्म असल्यामुळे ते अविज्ञेय आहे आणि दूर असूनही जवळ आहे.'' ।।१५।।

''ते (तत्त्वतः) 'अविभक्त' म्हणजे अखंड (असताही) सर्व भूतांत जणू काय (अनेकत्वाने) विभागून राहिले आहे व (सर्व) भूतांना धारण करणारे, ग्रासणारे, उत्पन्न करणारेही तेच समजले पाहिजे.'' ।।१६।।

''त्यालाच तेजाचेही तेज, व अंधकारापलीकडचे म्हणतात. 'ज्ञान', जे जाणावयाचे ते 'ज्ञेय', व 'ज्ञानगम्य' म्हणजे ज्ञानानेच कळणारेही तेच असून सर्वांच्या हृदयात तेच अधिष्ठित झालेले आहे.'' ।।१७।।

१२ व्या श्लोकात भगवान म्हणतात की, ते 'ज्ञेय' तत्त्व म्हणजेच परमात्मा. याला जाणल्यानेच अमरत्वाचा अनुभव येतो. आपण आपल्या शरीराशी आपले तादात्म्य मानून स्वतःला जन्म-मरणवाला मानले आहे. परमात्मतत्त्वाचे ज्ञान होताच हा भ्रम नाहीसा होतो. हे तत्त्व जाणणाऱ्याला आपल्या वास्तविक स्वरूपाचे ज्ञान होते, कारण आपण वस्तुतः अजर, अमर अशा परमात्म्याचेच अंश आहोत. ''ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ।'' (गीता-१५.७)

भगवान म्हणतात, तो परमात्मा अनादी असून सर्वांच्या पलीकडचा आहे. तो 'सत्'ही नाही आणि 'असत्'ही नाही. सत् आणि असत् या शब्दांचा व्यवहारात प्रचलित अर्थ 'चांगले व वाईट' असा असला तरी अध्यात्मात हे शब्द 'अविनाशी व विनाशी' किंवा 'अस्तित्व असलेला व अस्तित्व नसलेला' किंवा 'व्यक्त आणि अव्यक्त' या अर्थाने येत असतात. येथे हे शब्द 'व्यक्त आणि अव्यक्त' या अर्थाने योजलेले आहेत.

सृष्टीच्या मूळारंभी असत्‌ही नव्हते आणि सत्‌ही नव्हते. नाशवंत दृश्य शक्तीही नव्हती आणि अविनाशी, नित्य पदार्थही नव्हता. तेव्हा फक्त अनाकलनीय, मायेने आच्छादिलेले ब्रह्मच होते. त्याच्या संकल्पाने त्याची मायारूप अव्यक्त प्रकृती सृष्टीच्या रूपाने व्यक्त झाली. अर्थात जे असत् (अव्यक्त) होते, त्यापासूनच हे सारे सत् (व्यक्त) प्रगट झाले (ऋग्वेदातील

नासदीय सूक्त). पण परमात्मा त्या असत् किंवा सत्ने मर्यादित नाही. हे सारे विश्व तो आपल्या एका अंशाने धारण करीत आहे. "विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ।" (गीता-१०.४२). तो तर अव्यक्त प्रकृतीच्याही अत्यंत पलीकडे असणारे सनातन अव्यक्त तत्त्व आहे. "परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तोऽव्यक्तात्सनातनः ।" (गीता ८.२०). म्हणूनच गीतेत अर्जुन म्हणतो की, "त्वमक्षरं सदसत्तत्परं यत्" (११.३७) "आपण तर सत् आणि असत् या दोहोंच्या पलीकडचे परम अक्षर तत्त्व आहात." पण सत्-असत्च्या पलीकडचा असूनही सत्-असत्ही तोच परमेश्वर आहे. कारण सारे विश्व हे ईश्वराच्या अव्यक्त मायाशक्तीचेच व्यक्त रूप आहे. म्हणून "सत् असत् च अहम्" (सत् आणि असत् मीच आहे) असेही गीता सांगते. (गीता ९-१९)

१३ व्या व १४ व्या श्लोकांत भगवान म्हणतात की, त्यांचे हात-पाय, डोळे, मस्तक, मुख आणि कान सर्व ठिकाणी आहेत. ते सर्व सृष्टीच व्यापून आहेत. वस्तुस्थिती अशी आहे की, या दहा इंद्रियांच्या कामासाठी त्यांना इंद्रियांची जरूरच नाही. इंद्रिये हे प्रकृतीचे कार्य आहे. भगवान तर प्रकृतीच्या व तिच्या कार्याच्याही पूर्णपणे पलीकडचे आहेत. ते इंद्रियांशिवायच सर्व इंद्रियांचे विषय ग्रहण करू शकतात.

"ईशावास्यमिदं सर्वं यत्किञ्च जगत्यां जगत्" (ईशावास्योपनिषद्-१). अशी कोणतीच जागा नाही की, जिथे ते नाहीत. विश्वात जे काही चालते, ते सर्व त्यांना माहीत असते. त्यांना आसक्ती नाही, तरीही ते विश्वाचे पालन-पोषण करतात. ते निर्गुण आहेत (गुण हा केवळ प्रकृतीचा धर्म आहे), पण तरीही ते साऱ्या गुणांचा उपभोग घेतात. त्या चैतन्य तत्त्वामुळेच तर प्रकृती कार्यरत असते ना ! निर्गुण असूनही ते आपल्या प्रकृतीचा अवलंब करून सगुणरूपात अवतारही घेतात. "प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ।" (गीता ४.६)

पंधराव्या श्लोकात भगवान म्हणतात, ते सर्व प्राण्यांच्या आत-बाहेर भरून राहिले आहेत. आणि चराचर प्राणिमात्रही तेच आहेत. जसे, बर्फाचा घडा करून पाण्यात टाकला तर त्या घड्याच्या बाहेरही पाणी असते, आतही पाणी असते आणि तो घडाही (बर्फाचा म्हणून) पाणीच असतो. त्याचप्रमाणे सर्व चराचर प्राण्यांच्या बाहेरही परमात्मा, आतही परमात्मा आणि ते चराचरही परमात्माच आहे. या सर्व सृष्टीचे उपादान-कारण केवळ ईश्वरच आहेत. ते अत्यंत सूक्ष्म आहेत. त्यामुळे इंद्रिय मन-बुद्धीला ते कळत नाहीत. त्यांच्या ज्ञानासाठी या साधनांचा उपयोग नाही.



ते केवळ ज्ञान्यांकडून इंद्रियातीत स्थितीमध्ये आत्म्याच्या द्वारा जाणले जातात. ते दूर आहेत तसे जवळही आहेत. अर्थात अज्ञान्यांना ते दूर म्हणजे अप्राप्य आहेत आणि ज्ञान्यांना अत्यंत जवळ म्हणजे नित्यप्राप्त आहेत. कारण 'तत्त्वमसि' (तेच तू आहेस - छां. उप. ८.१६) म्हणजे 'आत्मा हाच परमात्मा' या सत्याचे त्यांना अनुभवात्मक ज्ञान आहे.

१६ व्या श्लोकात भगवान म्हणतात, वास्तविक ते एक व न विभागले गेलेले तत्त्व आहे. पण प्रत्येक शरीरात राहत असल्यामुळे विभागल्यासारखे वाटते. या विभागल्यासारख्या दिसणाऱ्या ईश्वरतत्त्वाला अविभक्त रूपात पाहणे, हेच सात्त्विक ज्ञान आहे. "अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विध्दि सात्त्विकम्" (गीता १८.२०). तेच सृष्टिनिर्मितीच्या वेळी 'ब्रह्मा' होऊन सर्व उत्पन्न करतात, 'विष्णू' होऊन नंतर त्याचे पालन-पोषण करतात आणि प्रलयकाळी 'रुद्र' होऊन सर्वांचा संहार करतात.

१७ व्या श्लोकात भगवान म्हणतात, ते ज्योतींचे ज्योती आहेत. सूर्य वगैरे सर्व प्रकाश देणाऱ्या वस्तू त्यांच्या प्रकाशानेच प्रकाशित होतात. अज्ञानरूप अंधाराच्या ते अत्यंत पलीकडे आहेत, कारण ते ज्ञानरूप आहेत. तेथे अज्ञानाचा लवलेशही नसतो. तसेच तेच 'ज्ञेय' अर्थात जाणण्यास योग्य आहेत. ज्ञानानेच त्यांचा अनुभव येतो. श्लोक ७ ते ११ पर्यंत 'ज्ञान' या नावाने ज्यांचे वर्णन आहे, त्या 'अमानित्वम्' इत्यादी साधनांनी अज्ञान नाहीसे झाल्यावर तत्त्वतः त्यांचे ज्ञान होऊ शकते. "हृदि सर्वस्य विष्ठितम्" ते सर्वांच्या हृदयात नित्य विराजमान असतात.

**इति क्षेत्र तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः ।**
**मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते ॥१८॥**

"याप्रमाणे क्षेत्र, तसेच ज्ञान व ज्ञेय म्हणजे काय, हे संक्षेपाने सांगितले. हे जाणले म्हणजे माझा भक्त माझ्या स्वरूपाला येऊन पोचतो." ॥१८॥

'क्षेत्र' नीटपणे समजून घेतले असता क्षेत्राशी जे आपले तादात्म्य आपल्याला वाटते, ते नाहीसे होते. तसेच 'अमानित्व' इत्यादी 'ज्ञानाची' साधने आत्मसात करण्याने देहाभिमान (आसक्ती) नाहीसा होतो. आणि 'ज्ञेय' तत्त्व पूर्णपणे जाणल्याने ज्ञेयाची प्राप्ती होते, अर्थात परमात्मतत्त्वाशी एकरूपतेचा अनुभव येतो.

या अध्यायातील १८ व्या श्लोकापर्यंत क्षेत्र (प्रकृती), ज्ञेय (परमात्मा), आणि क्षेत्रक्षेत्रज्ञज्ञान याची लक्षणे सांगितल्यानंतर ते ज्ञान प्रकृतिपुरुषविवेक

या रूपाने भगवंत आता सांगत आहेत.

**प्रकृति पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि ।**
**विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् ।।१९।।**
**कार्यकरणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ।**
**पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ।।२०।।**
**पुरुषः प्रकृतिस्थो हि भुंक्ते प्रकृतिजान्गुणान् ।**
**कारणं गुणसंगोऽस्य सदसद्योनिजन्मसु ।।२१।।**
**उपद्रष्टानुमंता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।**
**परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः ।।२२।।**
**य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिंच गुणैः सह ।**
**सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ।।२३।।**

"प्रकृती व पुरुष ही दोन्हीही अनादी असे समज. विकार व गुण हे सर्व प्रकृतीपासून उद्‌भवतात, असे जाण." ।।१९।।

"कार्य म्हणजे देह व करण म्हणजे इंद्रिये यांच्या कर्तृत्वास प्रकृती कारण आहे असे म्हणतात. आणि (अकर्ता असून) सुखदुःखाचा उपभोग घेण्यास पुरुष (क्षेत्रज्ञ) कारण आहे असे म्हटले आहे." ।।२०।।

"कारण-प्रकृतीत पुरुष अधिष्ठित झाला म्हणजे प्रकृतीच्या गुणांचा तो उपभोग घेतो.. आणि (प्रकृतीच्या) गुणांचा संयोग पुरुषाला बऱ्यावाईट योनीत जन्म घेण्यास कारण होतो." ।।२१।।

"(हा जो प्रकृतीच्या गुणांचा) उपद्रष्टा म्हणजेच जवळ बसून पाहणारा, अनुमंता म्हणजे अनुमोदन देणारा, भर्ता म्हणजे भरण-पोषण करणारा आणि उपभोग घेणारा म्हणून भोक्ता त्यासच या देहातील परपुरुष, महेश्वर आणि परमात्मा असे म्हणतात." ।।२२।।

"पुरुष आणि प्रकृती गुणांसह वर्तमान याप्रमाणे जो जाणतो, तो कसाही वागत असला, तरी त्याला पुनर्जन्म घडत नाही." ।।२३।।

सांख्यशास्त्राप्रमाणे प्रकृती व पुरुष हे दोन्ही अनादीच नव्हे तर स्वतंत्र व स्वयंभूही (स्वतः उत्पन्न) आहेत, पण वेदांतशास्त्राप्रमाणे प्रकृती ही स्वयंभू किंवा स्वतंत्र नाही; ती परमात्म्याचीच शक्ती आहे. अनादिकाळापासून परमेश्वराच्या संकल्पानुसार त्यांची ही त्रिगुणात्मक मायाशक्ती विश्वसंसार निर्माण करीत आहे. 'पुरुष' म्हणजे 'आत्मा'बद्दल 'ममैवांशो जीवलोके' - 'तो माझाच अंश आहे' - असे भगवंतांनी सांगितले आहे. (गीता १५.७). देह व इंद्रिये यांचे व्यापार प्रकृती करते आणि पुरुष हा सुखदुःखाचा उपभोग घडण्यास कारण असतो.



देहाचे ठिकाणी राहून - 'देह म्हणजे मी आहे' अविवेकाने त्याच्याशी असे ऐक्य करून पुरुष प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या सत्त्व, रज, तम या गुणांचा उपभोग घेतो. सत्त्वाने सुख, रजाने दुःख व तमाने मोह निर्माण होतो. याप्रकारे प्रकृतीच्या गुणांनी मोहित होऊन पुरुष प्रकृतीपासून आपला भिन्नपणा ओळखत नाही व संसारचक्रात गुंतून राहतो. गुणांचा हा संगच म्हणजे आसक्तीच पुरुषाच्या बऱ्यावाईट योनीमध्ये जन्म होण्याला कारण बनते.

यापुढे २२ व्या श्लोकात भगवंत मनुष्याच्या उत्तरोत्तर आध्यात्मिक विकासाविषयी सांगतात. आत्मा हा वास्तविक परमात्मरूपच असतो. जो प्रकृतिपूरक उपाधियुक्त भासतो तोच वस्तुतः प्रकृतीपलीकडील निरुपाधिक आहे. ('तत्त्वमसि'-छा. उप. ६-९-४)

भगवंत सांगतात की, अविद्येमुळे जोपर्यंत मनुष्य आपल्याला देहमात्र मानून देहात असलेल्या आत्म्याचा विचारच करीत नसतो, तोपर्यंत तो पशूसारख्या सामान्य जीवनात गुरफटलेला असतो, तोपर्यंत परमात्मा फक्त 'उपद्रष्टा' असतो, म्हणजे साक्षीभावाने सर्व बघतो.

यापुढे जेव्हा जीव जागा होतो आणि विवेक करू लागतो म्हणजे त्याची नैतिक भूमिका सुरू होते, तेव्हा परमात्मा नुसता स्वस्थ बसून पाहत नाही. तो आतून अनुमोदन देतो. तो आता 'अनुमंता' होतो.

या पुढची पायरी म्हणजे जीव नैतिक जीवनात कर्तव्य करीत असताना मनाचे सारे मळ धुण्यासाठी प्रयत्न करतो. पण अशा वेळी केवळ आपल्या शक्तीने ही चित्तशुद्धी होणे दुरापास्त आहे, याची जाणीव झाल्यानंतर तो असहाय्यपणे भगवंताचा धावा करतो. "देवा, माझ्या प्रयत्नांची पराकाष्ठा झाली. मला अधिक शक्ती दे, अधिक बल दे" - अशी जीव प्रार्थना करतो. आता केवळ अनुमोदन मात्र न करता साहाय्य करण्यासाठी भगवंत 'भर्ता' होऊन धावतो. याच्या पुढची पायरी म्हणजे परमेश्वराच्या कृपेप्रमाणे कर्माचे जे फळ मिळाले ते फळही आपण न घेता देवाला अर्पण करणे. "तुझे तुलाच अर्पण करतो" अशा प्रेम-भावनेने समर्पित केलेले फळ भोगण्यासाठी भगवंत तेव्हा 'भोक्ता' होऊन पुढे येतो.

याच्यापुढे संकल्प करणेही सोडून द्यावयाचे. आपल्या चित्तातील सर्व संकल्पांची जबाबदारी भगवंतावरच सोपवून द्यायची. तेव्हा अशा भक्ताची आरंभापासून अखेरपर्यंत सर्व सूत्रे भगवंतच चालवितात, म्हणजे भगवंत 'महेश्वराची' भूमिका घेतात. अशा प्रकारे विकास करता करता, भक्ताने

आपली बुद्धी, इंद्रिये, संकल्प, सारे प्रभूला वाहून संपूर्ण जीवनच हरिमय करायचे. भगवंतात मिळून गेलेले असे जीव ईश्वरमय होऊन जगतात. म्हणजे ते परमात्मारूपीच होतात. अज्ञान, अहंकार, कर्म, वासना यांचा क्षय झाल्यामुळे त्यांच्या हातून फक्त कर्तव्य म्हणूनच सर्व कर्म होते आणि म्हणून त्या कर्मापासून पुण्य-पाप-पुनर्जन्मरूपी कर्मविपाक होत नाही.

असे हे मोक्षदायक ज्ञान कसे प्राप्त होते याविषयी भगवंत प्रतिपादतात की,

**ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना ।**
**अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चापरे ।।२४।।**
**अन्ये त्वेवमजानन्तः श्रुत्वान्येभ्य उपासते ।**
**तेऽपि चातितरन्त्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ।।२५।।**

"काही लोक आपण होऊनच आपल्या ठायी ध्यानाने आत्म्याला पाहतात. काही सांख्ययोगाने आणि काही कर्मयोगाने." ।।२४।।

"परंतु ज्यांना याप्रमाणे (स्वतः) ज्ञान होत नाही असे कित्येक दुसऱ्याचे सांगणे ऐकून त्याप्रमाणे उपासना करतात. ऐकलेली गोष्ट प्रमाण मानून वागणारे हे पुरुषही मृत्यू तरून पलीकडे जातात." ।।२५।।

या श्लोकांत आत्मदर्शनाचे यथाधिकार उपाय सुचविले आहेत. ते म्हणजे (१) ध्यानयोग, (२) ज्ञानयोग (सांख्ययोग) आणि (३) कर्मयोग.

ध्यानयोग हे हार्दिक साधन असल्यामुळे साक्षात्कार प्रक्रियेत त्याला पहिले स्थान मिळते. सहाव्या अध्यायात ध्यानाची प्रक्रिया सविस्तर वर्णिली आहे. चित्तवृत्तींचा निरोध करून, इंद्रिय-विषयांना वश करून, मनोनिग्रह करून एकाग्र भावाने चिंतन करणे म्हणजे ध्यान. मनुष्याच्या अंतःकरणातच अमृताचा, शांतीचा, ज्ञानाचा, चिदानंदाचा झरा आहे. ध्यानाने हा आतला खजिना शोधता येतो.

इतर काही साधक सांख्ययोगाद्वारे आत्म्याला पाहतात. "सत्त्व, रज, तम - हे तिन्ही गुणांचे व्यापार मी साक्षीभावाने पाहत आहे; यातून वेगळा असून मी नित्य चेतन आत्मा आहे" - सांख्ययोगात अशा प्रकारचे चिंतन होते. आत्मदर्शनाचे हे बौद्धिक साधन आहे.

कर्मयोगात स्वकर्माच्या फुलांच्या ओंजळीने भगवंताची पूजा केली जाते. यामुळे चित्तशुद्धी होऊन सिद्धी प्राप्त होते. 'स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः' (गीता १८-४६)

आत्मदर्शनाचे हे तीन मुख्य मार्ग आहेत. पण कित्येक लोकांना



स्वतः ज्ञान प्राप्त करणे शक्य होत नाही. ते दुसऱ्याचे सांगणे ऐकून त्याप्रमाणे उपासना करून मृत्यू तरून जातात. श्रद्धेशिवाय कोणताच मार्ग नाही. मग ती श्रद्धा स्वयंप्रज्ञेची असो अथवा गुरुकृपेची असो.

भगवंताच्या विभूतींनी सर्व विश्व भरलेले आहे. त्याकडे पाहण्याची दृष्टी कशी असावी याचे वर्णन पुढील श्लोकांत केले आहे.

**यावत्संजायते किंचित्सत्त्वं स्थावरजंगमम् ।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ।।२६।।**
**समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं य परमेश्वरम् ।**
**विनश्यत्स्वविनश्यन्तंयः पश्यति स पश्यति ।।२७।।**
**समं पश्यन् हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् ।**
**न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् ।।२८।।**

"हे भरतश्रेष्ठा ! स्थावर किंवा जंगम जी कोणतीही वस्तू निर्माण होते, ती क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगापासून होते, हे ध्यानात ठेव." ।।२६।।

"सर्व भूतांचे ठायी सारखाच राहणारा व सर्व भूते नाहीशी झाली तरी ज्याचा नाश होत नाही, अशा परमेश्वराला ज्याने पाहिले, त्याने (खरे तत्त्व) ओळखले म्हणायचे." ।।२७।।

"ईश्वर सर्वत्र सारखाच भरलेला आहे हे जाणून (जो पुरुष) आपण आपलाच घात करीत नाही, म्हणजे आपण होऊनच चांगल्या मार्गाला लागतो, तो त्यामुळे उत्तम गतीस पोहोचतो." ।।२८।।

जीव या नावाने जे काही सर्व चराचर आहे ते क्षेत्र (देह) व क्षेत्रज्ञ (आत्मा) यांच्या संयोगाने निर्माण झाले आहे. खरे म्हणजे आत्मा हा परमात्म्याचाच अंश व देह किंवा प्रकृती ही परमात्म्याचीच मायाशक्ती असल्यामुळे सर्व भूते ही एकाच तत्त्वापासून होतात. त्यात वेगवेगळेपणा जरी दिसत असला तरी त्यांना व्यापून असणारी ब्रह्मवस्तू एकच आहे. अशा अद्वैत भावाने जो सर्वत्र पाहतो, तो खरोखर जन्ममरणाच्या आधीन होत नाही.

हा जो आत्मा आहे तो अकर्ता व निर्लेप आहे. प्रकृती सर्व कर्मे करते व पुरुष काहीच करीत नाही. याविषयीचे वर्णन पुढील श्लोकांत केले आहे.

**प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ।**
**यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति ।।२९।।**
**यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति ।**
**तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ।।३०।।**

**अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मायमव्ययः ।**
**शरीरस्थोऽपि कौंतेय न करोति न लिप्यते ।।३१।।**
**यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ।**
**सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते ।।३२।।**
**यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः ।**
**क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ।।३३।।**

''(सर्व) कर्मे सर्व प्रकारे केवळ प्रकृतीकडूनच केली जातात आणि आत्मा हा अकर्ता म्हणजे काही न करणारा आहे; हे ज्याने जाणले, त्याने (खरे तत्त्व) ओळखले म्हणायचे.'' ।।२९।।

''जेव्हा सर्व भूतांतील पृथकत्व म्हणजे नानात्व एकत्वाने (दिसू लागेल) आणि या (एकत्वा)पासूनच (सर्व) विस्तार (झाला आहे) असे दिसू लागेल, तेव्हा ब्रह्म प्राप्त होते.'' ।।३०।।

''अनादी व निर्गुण असल्यामुळे हा अव्यय परमात्मा शरीरात राहूनही हे कौंतेया ! काही करीत नाही व त्याला (कोणत्याही कर्माचा) लेप म्हणजे बंध लागत नाही.'' ।।३१।।

''ज्याप्रमाणे आकाश चोहोंकडे भरले असून सूक्ष्म असल्याने त्याला (कशाचाही) लेप लागत नाही, त्याप्रमाणे आत्माही देहात सर्वत्र राहत असून त्याला (कशाचाही) लेप लागत नाही.'' ।।३२।।

''ज्याप्रमाणे एकटा सूर्य सर्व जग प्रकाशित करतो, त्याप्रमाणे हे भारता ! क्षेत्रज्ञ सर्व क्षेत्राला म्हणजे शरीराला प्रकाशित करीत असतो.'' ।।३३।।

इंद्रिये, मन, बुद्धी, अहंकार व चेतना हे सर्व अनित्य असून प्रकृतीच आहे. (श्लोक १३.५, १३.६). या प्रकृतींपासूनच सर्व कर्मे होतात. प्रकृती ही आत्म्याच्या प्रकाशाने नाना प्रकारच्या कर्मांचा आरंभ करून त्रिगुणांनी खेळत असते व आत्मा अकर्ता होऊन आधारभूत राहतो. अशा या निर्णयाने ज्याच्या अंतःकरणात प्रकाश पडला, तो परमार्थदर्शी अकर्त्या आत्म्याला जाणतो.

भूते अनेक असली, तरी ती वास्तविक एकच आहेत. 'अविभक्तं विभक्तेषु' अशी ज्याला पाहण्याची दृष्टी लाभली, तो सर्वत्र आत्म्यालाच पाहतो.

देह अनित्य, क्षणभंगुर, विनाशी आहे. पण आत्मा स्वभावतः नित्य व सिद्ध आहे. सृष्टीचा संहार झाला तरी तो नाश पावत नाही.

शरीरस्थ आत्म्याला देहादिसंघातरहित असा ओळखावा. जसे



आकाश कशानेही व कधीही लिप्त होत नाही, तसा आत्मा सर्वत्र राहूनही विकारांनी बाधित होत नाही. अत्यंत व्यापक असूनही तो अक्रिय आहे.

ज्याप्रमाणे एकटा सूर्य या सर्व जगाला प्रकाशित करतो, त्याप्रमाणे एकटा क्षेत्रज्ञ सर्व क्षेत्रांना (शरीरांना) प्रकाशित करतो. कारण क्षेत्रज्ञ (परमात्मा) हा प्रकाशरूपच आहे. जसे घरातील दिव्याची ज्योत घरातील सर्व व्यवहारांना प्रकाशित करते, पण स्वतः अलिप्त राहते. किंवा काष्ठाच्या पोटात अग्नी आहे पण अग्नी काही काष्ठ नाही. तसाच देह व आत्मा यातील भेद जाणला पाहिजे.

ह्यानंतर संपूर्ण अध्यायाचा उपसंहार करताना भगवंत म्हणतात,

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा ।**
**भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यान्ति ते परम् ।।३४।।**

''याप्रमाणे ज्ञानचक्षूने म्हणजे ज्ञानरूप डोळ्याने, क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांमधील भेद आणि सर्व भूतांच्या (मूलभूत) प्रकृतीचा मोक्ष ज्यांनी जाणला ते परब्रह्माप्रत जातात.'' ।।३४।।

या श्लोकात समजावले आहे की, खरी डोळस बुद्धी हे क्षेत्र-क्षेत्रज्ञ यांतील अंतर पाहते आणि असे लोक क्षेत्रातील देहात्मता घालवून आत्मबुद्धीने अंतर्मुख होऊन आत्म्याचे श्रेष्ठत्व जाणतात. याप्रमाणे आत्म्याहून वेगळी असणारी जी प्रकृती तिला वेगळेपणाने, अंतःकरणाने जे पाहतात, ते ब्रह्मपदास पोहोचतात, असे भगवंत आश्वासन देतात. जीव, जगत, जगदीश्वर म्हणजेच प्रकृति-पुरुष-विवेकाने भरलेला हा नितांत सुंदर अध्याय आहे.

**।।श्रीकृष्णार्पणमस्तु।।**

# अध्याय चौदावा
# गुणत्रयविभागयोग

चौदावा अध्याय हा, तेराव्या अध्यायातील क्षेत्र-क्षेत्रज्ञ किंवा पुरुष-प्रकृती याविषयींच्या विचारांची पूर्तता करणारा अध्याय आहे. पुरुष (आत्मा) हा साक्षी, उदासीन तत्त्व आहे, तर प्रकृती ही सर्व प्राणिमात्राला संसारात ओढते. एकाच प्रकृतीपासून नानाविध सृष्टी, विशेषतः सजीव सृष्टी कशी उत्पन्न होते, याचे निरूपण या अध्यायात झाले आहे. शरीरधारी पुरुष (आत्मा) प्रकृतीच्या गुणांनी आकृष्ट होऊन त्यात रमत असल्याने, प्रकृतीच्या व्यापाराच्या अधीन, अंकित असतो. एरव्ही खरोखर पाहिले तर, आत्मा हा स्वयंपूर्ण, गुणातीत आहे. पण तो प्रकृतीच्या ज्या गुणांनी मोहित होतो, ते गुण किती व कसे आहेत, ते गुण त्याला कोणत्या प्रकाराने बद्ध करतात, तसेच गुणातीताची लक्षणे कोणती, याचा संपूर्ण विचार या अध्यायात झाला आहे. गीतेची मुक्त पुरुषाची कल्पना ही पुरुष आणि प्रकृती यांतील भेदावर आणि विशेषतः गुणांकित देहस्थ पुरुष व गुणातीत परम पुरुष (ईश्वर) यांतील भेदावर आधारलेली आहे. गीतेचा मुक्त पुरुष म्हणजे, ज्या पुरुषाने जाणीवपुरस्सर आपल्या अस्तित्वाचा धर्म ईश्वराच्या धर्माशी एकरूप केला आहे, तो पुरुष होय. ईश्वराची दिव्य प्रकृती जेव्हा आपली प्रकृती बनते, तेव्हाच साधर्म्य निर्माण होते. तीच ईश्वराशी एकरूपता. म्हणजे प्रकृतीच्या अतीत होऊन, गुणातीत होऊन, मुक्त होणे. गीतेच्या उपदेशाचे सार म्हणजे हे साधर्म्य प्राप्त करणे होय. आत्म्याची ही श्रेष्ठ अवस्था आहे. जन्म-मरणाच्या पलीकडे नेणारी व अनंत, शाश्वत, अनश्वर अवस्थेची अनुभूती देणारी ही मुक्त अवस्था आहे. भगवान श्रीकृष्ण या अध्यायात यासंबंधीचे विवेचन करीत आहेत. ह्या ज्ञानाची सुरुवात त्यांनी सातव्या अध्यायापासूनच केली आहे. या आत्मज्ञानाची महती पहिल्या दोन श्लोकांत ते अशी करतात-

**परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम् ।**
**यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः ।।१।।**



**इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः ।**
**सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च ।।२।।**

श्री भगवान म्हणाले, ''आणखी पुन्हा ज्ञानातले उत्तम ज्ञान सांगतो. जे जाणल्याने सर्व मुनींना या लोकांतून परम सिद्धी प्राप्त झाली आहे.'' ।।१।।

''या ज्ञानाचा आश्रय करून माझ्याशी एकरूपता पावलेले (माझ्यासमान झालेले) सृष्टीच्या उत्पत्तिकालीही जन्मत नाहीत आणि प्रलयकालीही व्यथा पावत नाहीत.'' ।।२।।

गीतेने इथे सर्वश्रेष्ठ, सर्वोत्तम ज्ञानाची व्याख्या केली आहे. ईश्वराशी साधर्म्य संपादन करून देणारे म्हणजे परम सिद्धी (परां सिद्धिम्) संपादन करून देणारे हे ज्ञान. या ज्ञानाने महान आध्यात्मिक अनुभूती प्राप्त करून, अनेक मुनिजन ईश्वराशी साधर्म्य पावले. प्रभव व प्रलय यांची बाधा त्यांना होत नाही. ही पूर्णता, हे साधर्म्य, हाच मोक्षमार्ग गीतेने प्रतिपादिला आहे.

सर्व ज्ञानात अध्यात्मज्ञान सर्वश्रेष्ठ आहे. या ज्ञानाने जीवनमुक्त होऊन मोक्ष प्राप्त करता येतो. भगवंताप्रत जाण्यासाठी मनुष्याला लाभलेले हे मोठे वरदान आहे. 'अध्यात्मविद्या विद्यानां' अशी या ज्ञानाची थोरवी भगवंतांनी आधीच सांगितली आहे. असे ज्ञान प्राप्त झाले की, जगात दुसरे काही जाणायचे राहत नाही व ते जाणून सर्व अशुभापासून मुक्ती मिळविता येते हे भगवंताचे आश्वासन आहे. असे हे दिव्य ज्ञान जाणून, ज्ञानी व्यक्ती भगवंताच्या दिव्य स्वभावाची प्राप्ती करून घेतात. अशा ज्ञानी पुरुषांमध्ये व भगवंतामध्ये काहीही द्वैत राहत नाही. जसे घट फुटल्यावर घटाकाश महाकाश होते किंवा दिव्याच्या मूळ ज्योतीत दुसऱ्या अनेक ज्योती मिळाल्या असता त्या जशा एकरूप होतात तसे हे ऐक्य असते. भगवंत जसा नित्य, आनंदमय, परिपूर्ण आहे तसेच हे ज्ञानी पुरुष होतात. ''साधर्म्यमागताः'' - जसे भगवंताचे गुण आहेत तसेच गुण या पुरुषांमध्ये प्रकट होतात. ''कृष्णो भूत्वा कृष्णं यजेत्'' अशी भक्ती त्यांच्याकडून होते.

ज्ञान जेव्हा केवळ शब्दरूप न राहता ते आचरणात येते व अनुभूतीतून प्रकट होते तेव्हाच ते दिव्य बनते. जोपर्यंत प्रत्यक्ष फळ खात नाही तोपर्यंत त्याचा स्वाद कळत नाही. केवळ फळाचे वर्णन करून स्वादाची कल्पना करता येत नाही. पोहण्याचे नियम पाठ करून जसे पोहता येत नाही तसे ज्ञान केवळ पाठ केल्याने किंवा ऐकून जीवनात उतरत नाही. ज्ञान प्रत्यक्ष कृतीत व वृत्तीत जेव्हा येते तेव्हा ती भगवंताची उपासना ठरते. भगवंताच्या सान्निध्यात बसणे म्हणजे उपासना. अशी उपासना ज्या महापुरुषांनी केली त्यांच्यात भगवंताचे गुण प्रकट झाले. अशा भगवंतमय झालेल्या महापुरुषांच्या

नावामागे 'भगवान' ही उपाधी आपोआप जोडली गेली. भगवान शंकराचार्य, महाविष्णूचा अवतार श्री ज्ञानदेव, भगवान श्री रमण महर्षि, जगद्गुरू तुकाराम, भगवान श्री रामकृष्ण परमहंस अशा महापुरुषांनी भगवंताची असीम कृपा प्राप्त केली. भगवंताचे दिव्य गुण ग्रहण केले. केवळ ग्रंथपठण करून त्यांनी हे ज्ञान प्राप्त केले नाही. भगवंताचे गुण आचरणात आणता आणता तेच भगवंतमय झाले. भगवंतासारखे होणे हेच भक्तीचे अंतिम साध्य आहे. परमात्मा दयाळू आहे तसे हे महापुरुष दयेचा सागर होते. भगवंत निर्विकार आहे तसे हे संत विकाररहित होते. परमात्मा दाता आहे तसे हे महापुरुष समाजाला देतच राहिले. संत-महात्म्यांनी जगाला एवढे प्रेम दिले की, सर्व शक्तिमान भगवंताच्या दिव्य प्रेमात व संतांच्या प्रेमात काही फरकच राहिला नाही. म्हणूनच भगवान श्रीकृष्ण वरील श्लोकात म्हणतात की, माझ्या या ज्ञानाने माझ्यासारखेच दिव्य गुण प्राप्त करून अनेक मुनी-जन मुक्त झाले. जन्म-मरणाच्या फेऱ्या त्यांच्यासाठी राहिल्या नाहीत. मोक्ष प्राप्त करून त्यांनी परमसिद्धी मिळविली. ज्ञानाने ते माझ्याशी एकरूप झाले.

म्हणून ज्ञान सिद्धीपर्यंत घेऊन जाणारे साधन आहे. याच ज्ञानाने, स्वतःचे स्वतःला जाणायचे. स्वस्वरूपाच्या प्राप्तीनंतर भगवंताची दिव्यता व विश्वाचे स्वरूप जाणायचे. हे ज्ञानच मनुष्यातील आंतरिक चेतना जागृत करते.

या दोन प्रस्तावनेच्या श्लोकांनंतर, भगवंत आता प्रकृती, भूतांची उत्पत्ती, परमेश्वराची यांतील भूमिका यांचे वर्णन पुढील दोन श्लोकांत करीत आहेत.

**मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम् ।**
**संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ।।३।।**
**सर्वयोनिषु कौंतेय मूर्तयः संभवन्ति याः ।**
**तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ।।४।।**

"हे भारता! महद्ब्रह्म म्हणजे प्रकृती ही माझीच योनी असून मी त्या ठिकाणी गर्भ ठेवतो. नंतर त्यापासून सर्व भूते उत्पन्न होतात. ।।३।।

"(पशुपक्ष्यादी) सर्व योनीत, ज्या ज्या मूर्ती जन्मास येतात, त्यांची हे कौंतेया! महद्ब्रह्म ही योनी असून मी बीजदाता पिता आहे." ।।४।।

महद्ब्रह्म म्हणजे अव्यक्त, मूळ प्रकृती म्हणजे परमात्म्याची मायाशक्ती; तीच सर्व जीवांचे उत्पत्तिस्थान होय. परमात्मा क्षेत्रज्ञ आणि मूळ प्रकृती ही क्षेत्र. परमात्मा महद्ब्रह्मरूप आपल्या योनीत चेतनतत्त्वरूप आपले बीज टाकतो आणि या संयोगातूनच सर्व जीवांची उत्पत्ती होते. म्हणून परमात्माच सर्व जीवांचे पितृस्वरूप आहे आणि मूळ प्रकृती ही मातृस्वरूप आहे. क्षेत्रज्ञ



परमात्मा आणि क्षेत्र प्रकृती - या दोन्हींच्या संयोगानेच सर्व प्राणिमात्रांची उत्पत्ती झाली आहे.

म्हणून निरनिराळ्या दिसणाऱ्या असंख्य जीवांच्या अंतरात जे आत्मतत्त्व आहे, ते एकमेव परमात्माच आहे, असे समजले पाहिजे. सर्व आत्मे त्या शाश्वत चैतन्यतत्त्व परमात्म्याचेच अंशरूप आहेत. ('ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः' - गीता १५-७) अज्ञान म्हणजे अविद्येमुळेच याचे ज्ञान आपल्यास होत नाही.

तसेच, सर्व शरीरात मन, बुद्धी, अहंकार व पंचमहाभूते ही जी आठ तत्त्वे आहेत, ती सर्व एकमेव प्रकृतीचेच विकार होत. म्हणून निरनिराळी शरीरे पाहून चित्तात भेद येऊ देऊ नये.

**आता शरीरे बहुते । देखोनि न भेद हो चित्ते ।।**
**जे मनबुद्ध्यादि भूते । एकेचि येथे ।।** (ज्ञाने.१४.११७)

परमात्म्याची मायाशक्ती प्रकृती ही त्रिगुणात्मक आहे. प्रकृतीपासून उत्पन्न झालेले सत्त्व, रज, तम हे तीन गुण व त्यांच्या कार्यांबद्दल पुढील श्लोकांत वर्णन केले आहे.

**सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः ।**
**निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ।।५।।**
**तत्र सत्त्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम् ।**
**सुखसंगेन बध्नाति ज्ञानसंगेन चानघ ।।६।।**
**रजो रागात्मकं विद्धि तृष्णासंगसमुद्भवम् ।**
**तन्निबध्नाति कौंतेय कर्मसंगेन देहिनम् ।।७।।**
**तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम् ।**
**प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ।।८।।**
**सत्त्वं सुखे संजयति रजः कर्मणि भारत ।**
**ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे संजयत्युत ।।९।।**

"हे महाबाहो! प्रकृतीपासून उत्पन्न झालेले सत्त्व, रज व तम हे गुण देहात राहणाऱ्या अव्ययास म्हणजे निर्विकार आत्म्यास देहात बांधून टाकतात." ।।५।।

"पैकी निर्मल असल्यामुळे प्रकाश पाडणारा व निर्दोष असा जो सत्त्वगुण तो हे निष्पाप अर्जुना! सुख आणि ज्ञान यांच्या संगाने (मनुष्यास) बांधून टाकतो." ।।६।।

"रजोगुणाचा स्वभाव रागरूप असून तृष्णा व आसक्ती ह्यांपासून उत्पन्न होतो, असे समज. हे कौंतेया! तो प्राण्याला कर्मे करण्याच्या (प्रवृत्तिरूप) संगाने बांधून टाकतो." ।।७।।

“तमोगुण अज्ञानापासून उत्पन्न होऊन सर्व प्राण्यांना मोह घालणारा आहे, असे समज. हे भारता! तो प्रमाद, आळस, निद्रा यांनी (त्यास) बांधून टाकतो.” ।।८।।

“सत्त्वगुण सुखाचे ठायी व रजोगुण कर्मांचे ठायी आसक्ती उत्पन्न करितो, परंतु हे भारता! तमोगुण हा ज्ञानावर पांघरूण घालून प्रमाद म्हणजे कर्तव्यविमूढता किंवा कर्तव्याचा विसर याच्या ठायी आसक्ती उत्पन्न करतो.” ।।९।।

भगवंताच्या मायेचे हे तीन गुण सर्व मनुष्यमात्रात उपस्थित असून त्यानुसार मनुष्याचे वर्तन घडत असते. कोणीही मनुष्य असा नाही की, त्याच्या ठिकाणी या तीन गुणांपैकी एखाद्याचा संपूर्ण अभाव आहे. तसेच कोणत्याही मनुष्यात या तीन गुणांपैकी फक्त कोणतातरी एकच गुण आहे, अशीही वस्तुस्थिती नाही. तर प्रत्येकात या तिहींचे कार्य सारख्या प्रमाणातही घडत नसते. हे प्रमाण कमी-अधिक होत असते. परस्परांना हे तिन्ही गुण नेहमी स्थानभ्रष्ट करीत असतात. मनुष्याला सात्त्विक, राजसिक, तामसिक असे जे म्हणतात, ते तो गुण त्याच्या ठिकाणी सामान्यतः प्रमुखत्वाने दिसतो म्हणून. असे हे तिन्ही गुण प्रकृतीत भरून राहिले आहेत. स्वयंपूर्ण आत्म्याला हे गुणच देहात बांधून टाकतात. या तिन्हींपासून आत्म्याला अलग करता आले, तरच देहात्मकता नाहीशी होईल.

सत्त्व, रज व तम या तीन गुणांची ही पृथक् पृथक् लक्षणे जरी वर्णिली असली, तरी हे गुण पृथक् पृथक् कधीच राहत नसून नेहमी तिन्ही एकत्र असतात. सत्त्व म्हणजे ज्ञान व सुख; रज म्हणजे कर्म व दुःख; आणि तम म्हणजे अज्ञान व आळस. सत्त्वगुण प्रकृतीचे पहिले अपत्य आहे. म्हणजे क्रमाच्या नव्हे, तर श्रेणीच्या दृष्टीने! सत्त्वगुणात मन, बुद्धी, इंद्रिये ही प्रसन्न असतात आणि ज्ञानयुक्त असतात. माणूस जितका निष्काम, निरहंकारी, संतुष्ट, वैराग्यपूर्ण असतो, तितका तो सत्त्वगुणावरही ताबा ठेवू शकतो. रजोगुणात इंद्रिये बाह्यविषयात अधिक रममाण होतात. त्यामुळे लोभाने बुद्धीत सतत कामना निर्माण होते. रजोगुणाच्या प्राबल्याने मनुष्य सतत सकाम भावनेने कार्यशील असतो. अशा रजोगुणी माणसाकडून काही सत्कृत्ये, परोपकार, भक्ती व धर्माचे आचरणसुद्धा घडते. पण हे सारे आत्मविकासासाठी नसून केवळ उपभोगार्थ असते. लोकेषणा, वित्तेषणा यांच्या कच्छपी लागून आत्मनाशाकडे मात्र तो वाटचाल करतो. रावणाची भक्ती ही रजोगुणी होती. केवळ भौतिक सुखासाठी रावणाने किती कठोर साधना केली! या तिन्ही गुणांमध्ये तमोगुण तर अधोगतीला, अपकर्षाला कारणीभूत ठरणारा



असा आहे. अपरिमित भोगलालसा; विवेकशून्य कृत्ये; विषय-वासनांनी भरलेली कर्मेंद्रिये; मोहग्रस्त बुद्धी; प्रमाद, आळस, निद्रा यांनी भरलेले जीवन; अशी ही तमोगुणाची लक्षणे! अशा तामसप्रवृत्तीच्या लोकांना काही काम न करता सर्व काही फुकट हवे असते. मन, बुद्धी यांचा विकास न करता पशुतुल्य जीवन जगण्यात हे लोक धन्यता मानतात. असा हा तमोगुण अज्ञानापासून उत्पन्न होतो. त्यामुळे अविचार हाच तमोगुणाचा महामंत्र आहे. देह हाच आत्मा आहे, असे समजून आत्मानंदाला तो पारखा होतो. विवेक, वैराग्य, ज्ञान यांच्याशी त्याचे हाडवैर! त्यामुळे आत्मविकास शून्य.

आज समाजात या तमोगुणाचे प्राबल्य वाढले आहे. त्यामुळेच झटपट श्रीमंती, कष्ट न करता वैभवाची अपेक्षा, ईर्ष्या, द्वेष यांमुळे सतत संघर्ष, विषय-वासनांचा नंगानाच या गोष्टी दिसून येतात. या तमोगुणामुळे समाजाची हानी होत आहे. अशा परिस्थितीत गीतेच्या विचारांची आज खरी गरज आहे. गीता ही जीवन-संहिता आहे. खरे सुख भोगात नसून त्यागात आहे. प्रसन्नता, स्थिर बुद्धी, शुद्ध आचरण यांतच खरे सुख आहे. उत्तम विचारांनीच माणसाचे उन्नयन होते. ‘मननात् इति मनुष्यः’ मनन, चिंतन, निदिध्यासन यांनी माणूस उन्नत होतो. जितकी सात्त्विकता माणसात येते, तेवढे आत्मसुख त्याला लाभते. दैवी गुणांचा प्रभाव वाढून तो स्वतःचेही कल्याण साधतो व त्याच्या संपर्कात येणाऱ्या सर्वांचेही कल्याण करतो.

मनुष्यात सतत बदल घडत असतात. याला कारण म्हणजे हेच त्रिगुण! कोणत्या गुणाच्या प्रभावाने स्वभावात कसा कसा बदल होतो, त्याचे वर्णन भगवंतांनी पुढील चार श्लोकांत केले आहे -

**रजस्तमश्चाभिभूय सत्त्वं भवति भारत ।**
**रजः सत्त्वं तमश्चैव तमः सत्त्वं रजस्तथा ।।१०।।**
**सर्वद्वारेषु देहेऽस्मिन्प्रकाश उपजायते ।**
**ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्त्वमित्युत ।।११।।**
**लोभः प्रवृत्तिरारंभः कर्मणामशमः स्पृहा ।**
**रजस्येतानि जायन्ते विवृद्धे भरतर्षभ ।।१२।।**
**अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च ।**
**तमस्येतानि जायन्ते विवृद्धे कुरुनन्दन ।।१३।।**

“रज व तम यांचा पाडाव करून सत्त्व (वरचढ) होतो. त्याचप्रमाणे सत्त्व व तम यांचा पाडाव करून रज, आणि सत्त्व व रज यांचा पाडाव करून तम (वरचढ होत असतो).” ।।१०।।

"या देहात सर्व द्वारांत (इंद्रियांत) प्रकाश म्हणजे निर्मल ज्ञान जेव्हा उत्पन्न होते, तेव्हा सत्त्वगुण वाढला आहे असे समजावे." ।।११।।

"हे भरतश्रेष्ठा! रजोगुण वाढला म्हणजे लोभ, कर्माकडे प्रवृत्ती व त्यांचा आरंभ, अतृप्ती व इच्छा हे उत्पन्न होतात." ।।१२।।

"आणि हे कुरुनन्दना! तमोगुण वाढला म्हणजे अंधार, काही करू नये असे वाटणे, प्रमाद म्हणजे कर्तव्याचा विसर आणि मोह हे देखील उत्पन्न होत असतात." ।।१३।।

अज्ञान, प्रमाद, आळस, निद्रा या तमोगुणांवर मात करून तसेच ईषणा, आसक्ती, अपरंपार कर्मसंग व हव्यास या रजोगुणांवर मात करून सत्त्वगुण वाढत असतो. सत्त्व व रजोगुणांवर मात करून तामस हा गुण वाढतो. इतर दोन गुणांवर मात करून तिसरा वाढतो, हे सूत्र या त्रिगुणात आहे.

सत्त्वगुणी माणूस निरहंकारी, अनासक्त बनतो. सात्त्विक माणसे आपल्या दैवी गुणांमुळे इतरांना मार्गदर्शक होतात. सत्त्वगुणी माणूस अंतर्बाह्य शुद्ध असल्यामुळे त्याच्या शुद्ध चित्तात ज्ञानाचा प्रकाश पडतो. असे निर्मल ज्ञान जेव्हा वाढते, तेव्हा सत्त्वगुण वाढला आहे, असे समजावे.

रजोगुणाच्या प्रभावाने माणसाला नाना प्रकारची कार्ये करण्याचा हव्यास जडतो. जगावेगळे काम करून सर्वांना दिपवून टाकण्यासाठी रजोगुणी जिवाचे रान करतो. अशा वेळी तो विवेक, तर-तम बुद्धी, सदसद्विवेक-बुद्धी याचा काही आधार न घेता, वासना-विकारांच्या अधीन होतो. लोभात्मक कर्मासक्तीमुळे त्याच्या अपयशातून दारुण दुःख व यशामुळे राक्षसी महत्त्वाकांक्षा यांच्या कचाट्यात तो सापडतो. त्यामुळे अस्थिर मनाने व धरसोड वृत्तीने रजोगुणी सतत कशाचा ना कशाचा हव्यास करीत असतो. आज मी हे मिळविले, उद्या मी ते जिंकणार, अशा आशा-आकांक्षातून त्याचे चित्त सतत भ्रमण करीत असते. सत्त्वगुण हा ज्ञान आणि सुखाकडे नेतो म्हणून तो ज्ञानात्मक आहे; रजोगुण हा वासनेच्या द्वारा कर्माला प्रवृत्त करणारा असल्याने तो क्रियात्मक आहे; तर तमोगुण म्हणजे दोन्हीबद्दलची अक्षमता, म्हणजे तो अज्ञानात्मक व अक्रियात्मक असा आहे. तामस आला की अज्ञान आलेच. मोहग्रस्तता, प्रमाद, आळस या गुणांनी मंडित होऊन माणसाची अंतर्मुखता लोपते. आत्महनन करणे हा तमोगुणीचा स्थायिभाव होतो. "विद्या विवादाय, धनं मदाय, शक्तिः परेषां परिपीडनाय." - "विद्या संघर्षासाठी, धन अहंकारासाठी व बळ दुसऱ्यांना सतावण्यासाठी" अशी त्यांची वृत्ती बनते. विचारशून्यता हा स्वभाव बनतो. अशा प्रकारे या तीन गुणांमुळे माणसांच्या स्वभावात फरक दिसतो.



जेव्हा सत्त्वगुण वाढतो, तेव्हा मनुष्याची प्रवृत्ती प्रकाशाकडे वाटचाल करते, ज्ञान वाढते, सत्संगाबद्दल रुची वाढते. सात्त्विकता माणसाला नम्र, निरहंकारी व संतुष्ट बनविते. अशा सत्त्वशील माणसाच्या सहवासात इतरांनाही प्रसन्नतेचा अनुभव येतो. रजोगुणी माणसाची धडपड सतत काहीतरी मिळविण्यासाठी चालूच असते. प्रचंड लोभ, अपरिमित लालसा यांमुळे सतत अशांती रजोगुणी माणसाला घेरत असते. आणि तमोगुणी माणूस तर अंधारातच चाचपडत असतो. आळस, प्रमाद, आसक्ती, मोहग्रस्तता अशा लक्षणांनी युक्त असलेल्या तमोगुणी माणसाचे जीवन पशुतुल्य असते. गुणांच्या प्राबल्यानुसार, ऐहिक जीवनात लोकांची अशी भिन्न भिन्न अवस्था होत असते. मग शरीर सोडल्यानंतर ते कोणत्या योनीत जातात? मृत्यूनंतर त्यांना कोणती गती प्राप्त होते, याविषयी भगवान श्रीकृष्ण आता पुढील श्लोकांत वर्णन करीत आहेत -

**यदा सत्त्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत् ।**
**तदोत्तमविदां लोकानमलान्प्रतिपद्यते ।।१४।।**
**रजसि प्रलयं गत्वा कर्मसंगिषु जायते ।**
**तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ।।१५।।**
**कर्मणः सुकृतस्याहुः सात्त्विकं निर्मलं फलम् ।**
**रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलम् ।।१६।।**
**सत्त्वात्संजायते ज्ञानं रजसो लोभ एव च ।**
**प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च ।।१७।।**
**ऊर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्था मध्ये तिष्ठन्ति राजसाः ।**
**जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छन्ति तामसाः ।।१८।।**

"सत्त्वगुणाचा उत्कर्ष झाला असता मनुष्य मरण पावला तर उत्तम तत्त्वे जाणणाऱ्याचे म्हणजे देवादिकांचे निर्मल लोक त्याला प्राप्त होतात." ।।१४।।

"रजोगुणाचे प्राबल्य असता मरण पावला तर कर्मात आसक्त झालेल्या (जनांत) जन्म घेतो आणि तमोगुणात मेला तर (पशुपक्ष्यादी) मूढ योनींत जन्मतो." ।।१५।।

"पुण्यकर्माचे फल निर्मल व सात्त्विक पण राजस कर्माचे फल दुःख आणि तामस कर्माचे फल अज्ञान होय, असे म्हटले आहे." ।।१६।।

"सत्त्वापासून ज्ञान, तर रजोगुणापासून केवळ लोभ उत्पन्न होतो. तमोगुणापासून प्रमाद व मोहच नव्हे तर अज्ञानही उत्पन्न होते." ।।१७।।

"सात्त्विक पुरुष वरच्या म्हणजे स्वर्गादी लोकांस जातात. राजस मध्यम म्हणजे मनुष्यलोकी राहतात आणि कनिष्ठगुणवृत्तीचे तामस अधोगतीस जातात." ।।१८।।

जशी वासना तशीच गती! तसाच जन्म! सत्त्वगुणाचा उत्कर्ष झाला असता जर मनुष्य मृत्यू पावला तर देवादिकांचे निर्मल, उत्तम लोक त्याला प्राप्त होतात. रजोगुणी परत तेच तेच अनुभवण्यासाठी जन्म-मृत्यूच्या रहाटगाडग्यात अडकतो. कर्मात आसक्त असलेल्या लोकांच्या ठायीच त्याचा जन्म होतो. तर तमोगुणी तमाच्या उत्कर्षात मरण पावतो म्हणून अज्ञानमय पशुयोनीत पुढला जन्म घेतो. सत्त्वगुणाचा उत्कर्ष म्हणजे ज्ञानाचा उदय! प्रकृती, पुरुष व परमेश्वर ही त्रयी म्हणजे जगत्, जीव व जगदीश्वर. यातील परमेश्वराच्या स्वरूपाचे ज्ञान म्हणजे ज्ञानातले उत्तम ज्ञान... आत्मज्ञान. हे ज्ञान प्राप्त झाले म्हणजे अज्ञान नष्ट होते. अज्ञान नाहीसे होणे म्हणजेच मोक्ष. आणि मोक्ष हीच सत्त्वगुणाच्या उत्कर्षाची सर्वोच्च स्थिती. पण अशा स्थितीसाठी आपल्या इंद्रियांवर विजय मिळणे आवश्यक आहे. संत तुकारामांच्या शब्दात...

**नाही देवापाशी मोक्षाचे गांठोळे ।**
**आणूनी निराळे द्यावे हाती ।।१।।**
**इंद्रियांचा जय साधूनिया मन ।**
**निर्विषय कारण असे तेथे ।।२।।**

(अ. १३२-गाथा)

"आपल्या हातात आणून द्यावे असे मोक्षाचे गाठोळे देवापाशी नाही. मोक्षासाठी इंद्रियांवर जय मिळवून मन ताब्यात आणावे म्हणजे त्यातून विषय काढून टाकणे हे आवश्यक आहे."

इंद्रियविजय म्हणजेच चित्तशुद्धी. अशा सत्त्वगुणी साधकाच्या मनातून आसक्ती, अहंकार निघून जातात. सात्त्विक गुणांचा उत्कर्ष होऊन हे पुरुष हळूहळू संतपदाला पोहोचतात. त्यांच्या ठायी प्रेमाचा इतका प्रकर्ष होतो की, अवघ्या विश्वावर त्यांच्या प्रेमाचा वर्षाव होतो आणि संपूर्ण विश्व त्यांच्यावर प्रेम करते. अशी अवस्था झाल्याने याच जन्मी, देहात असतानाच, ते मुक्ति-सुख अनुभवतात.

सत्त्वगुणामुळे अशा साधकांच्या हातून निर्मळ सुकृतेच घडतात. इंद्रियविजयाची त्याची साधना सुरुवातीला कठोर वाटते पण त्यातून ज्ञान व शांतिरूप लोकोत्तर, मधुर फळ प्राप्त होते. आणि जसे कडुनिंबाच्या निंबोळ्या बाहेरून सुंदर दिसतात, पण त्या आतून कडवट असतात, तसेच काम, लोभ यांनी भरलेल्या राजस क्रिया सुरुवातीस गोड वाटतात, पण त्याचे अंतिम फल अतृप्ती, दुःख हेच असते. आणि ज्याप्रमाणे विषारी अंकुरापासून शेवटी विषारी फळच मिळते, त्याचप्रमाणे सर्व तामस कर्मांचे फल अज्ञान व मोह हेच असते.



हे संपूर्ण जग या त्रिगुणांनी भरलेले आहे, पण या गुणांच्या पलीकडे असणारी गुणातीत अवस्था मनुष्याला मोक्षाप्रत नेणारी अवस्था आहे. त्याचे वर्णन भगवंतांनी पुढील श्लोकांत केले आहे -

**नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति ।**
**गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति ।।१९।।**
**गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान् ।**
**जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ।।२०।।**

"द्रष्टा म्हणजे उदासीनपणे पाहणारा पुरुष, (प्रकृतीच्या) गुणांखेरीज दुसरा कोणी कर्ता नाही असे जेव्हा जाणतो व (तिन्ही) गुणांच्या पलीकडचे (तत्त्व) ओळखतो, तेव्हा तो माझ्या स्वरूपाला पोहोचतो." ।।१९।।

"देहधारी मनुष्य देहोत्पत्तीस कारण झालेल्या या तिन्ही गुणांच्या पलीकडे जाऊन जन्म, मृत्यू, जरा यांच्या दुःखांनी विमुक्त होऊन अमृताचा म्हणजे मोक्षाचा अनुभव घेतो." ।।२०।।

खरे म्हणजे या जगातील सर्व कर्मे प्रकृतीच्या या त्रिगुणांमुळेच होत असतात. आत्मा वास्तविक नेहमी अकर्ताच असतो. पण देहात रममाण झाल्यामुळे तो भ्रमवश स्वतःलाच कर्ता समजून अशांत राहतो. पण जेव्हा माणसाला असा अनुभव येतो की, मी देह नाही, मी ब्रह्माचाच साक्षात् अंश आहे, तेव्हा तो प्रकृतीच्या ह्या क्रीडेत आसक्त होत नाही. तेव्हा तो सत्त्व, रज, तम या तिन्ही गुणांचे खेळ साक्षीभावाने पाहतो. आणि या प्रकारे त्रिगुणातीत स्थितीत राहून नेहमी दुःखमुक्त, परम शांतीत जगतो.

पण असे करणे शक्य कसे होते? याचा सुगम व समर्थ उपाय गीतेतच सुचविला आहे. गुणातीत होणे म्हणजे कर्मे थांबविणे असे नव्हे. गीता कर्मत्यागाचा उपदेश देत नाही. गुणांपासून आत्म्याने स्वतंत्रता मिळवावी, पण त्याचबरोबर कर्मही झाले पाहिजे असा गीतेचा आग्रह आहे. नाहीतर यज्ञ, दान, तप इ. जी कर्तव्य-कर्मे असतात, तीसुद्धा नाहीशी होतील. भगवंत म्हणतात की, कर्माप्रत आसक्ती न ठेवता व फळाची अपेक्षा न करता आपले कर्म प्रभूला अर्पण केले पाहिजे आणि स्वतःला त्याच्या इच्छेचे एक वासनाशून्य साधन बनविले पाहिजे. प्रकृतीचे गुण हे आपल्या कर्माचे एकमेव कारण आणि कारक आहेत हे ओळखणे आणि गुणांच्या पलीकडे जो पुरुषोत्तम आहे, त्याचे ज्ञान करून घेऊन त्याजकडे वळणे, त्याला सर्वभावे शरण जाणे हाच एक गुणातीत होण्याचा मार्ग आहे. केवळ या मार्गाने जाऊनच ईश्वराची दिव्य अवस्था, मोक्षस्थिती याची अनुभूती प्राप्त होईल. हा ईश्वरभाव आत्मसात झाल्यानंतर जन्म, मृत्यू, जरा आणि त्यांचे सहचर

क्षीणता, यातना यांच्या कचाट्यातून पार होऊन अमृतत्व, शाश्वतत्व प्राप्त करता येईल.

यावर अर्जुनाने भगवंताला गुणातीताच्या लक्षणांविषयी प्रश्न विचारला.

**कैर्लिंगैस्त्रीन्गुणानेतानतीतो भवति प्रभो ।**
**किमाचारः कथं चैतांस्त्रीन्गुणानतिवर्तते ।।२१।।**

''हे प्रभो! कोणत्या लक्षणांनी या तीन गुणांच्या पलीकडे जातो? त्या (त्रिगुणातीताचा) आचार कसा आणि तो या तीन गुणांच्या पलीकडे कसा जातो?'' ।।२१।।

अर्जुनाच्या या प्रश्नांची उत्तरे भगवंतांनी पूर्वीच दिलेली आहेत. दुसऱ्या अध्यायात स्थितप्रज्ञाची लक्षणे सांगितली. बाराव्या अध्यायात भक्ताची लक्षणे कथन केली. तेराव्या अध्यायात ज्ञानाची लक्षणे सांगितली आणि आता गुणातीताचे वर्णन प्रभू करीत आहेत.

**प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पांडव ।**
**न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि कांक्षति ।।२२।।**
**उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते ।**
**गुणावर्तन्त इत्येवं योऽवतिष्ठतिनेंगते ।।२३।।**
**समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकांचनः ।**
**तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिन्दात्मसंस्तुतिः ।।२४।।**
**मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः ।**
**सर्वारम्भपरित्यागी गुणातीतः स उच्यते ।।२५।।**

''हे पांडवा! प्रकाश, प्रवृत्ती आणि मोह (म्हणजे अनुक्रमे सत्त्व, रज, तम) या गुणांनी कार्ये किंवा फले प्राप्त झाली नाही, तरी (जो) त्यांची आकांक्षा ठेवीत नाही.'' ।।२२।।

''(कर्माबद्दल) जो उदासीनासारखा राहणारा, (सत्त्व, रज, तम हे) गुण ज्याला चाळवू शकत नाहीत, गुण (आपापले) काम करीत आहेत, एवढेच मानून जो स्थिर राहतो, हलत नाही म्हणजे विकार पावत नाही.'' ।।२३।।

''ज्याला सुख व दुःख सारखेच, जो स्वस्थ म्हणजे आपल्या ठिकाणीच स्थिर झाला; माती, दगड व सोने ही ज्याला सारखीच; प्रिय व अप्रिय, निंदा व आपली स्तुती ही ज्याला समसमान, जो सदा धैर्याने युक्त.'' ।।२४।।

''ज्याला मान व अपमान किंवा मित्र व शत्रुपक्ष तुल्य म्हणजे एकसारखे आणि (प्रकृतीच सर्व काही करते असे समजल्यामुळे) ज्याचा सर्व कर्मांतील कर्ताभाव सुटला, त्या पुरुषास गुणातीत असे म्हणतात.'' ।।२५।।



गुणातीताचे लक्षण म्हणजे समबुद्धी! गुणातीत हा आंतरिक दृष्टीने सुख आणि दुःख सारखेच मानतो. सोने, माती, दगड सारखे मानतो. स्तुती आणि निंदा, मान व अपमान, शत्रुपक्ष व मित्रपक्ष त्याला सारखेच वाटतात. तो विवेकी असतो. त्याची आंतरिक शांती व प्रसन्नता अभंग, अभेद्य असते. प्रकृतीच्या गुणांद्वारे होणाऱ्या कर्मे व कर्मफलांप्रत त्याच्या मनात आसक्तीऐवजी साक्षीभाव आणि लोभाऐवजी कर्तव्यभाव असतो. तो गुणांच्या हालचालीने विचलित होत नाही. आनंदही मानत नाही व खेदही! गुणांचे वादळ व शांतता ही केवळ प्रकृतीची कृती आहे, याचा आपल्या स्वरूपाशी यत्किंचितही संबंध नाही अशी वृत्ती धारण करून तो त्या आत्मस्थितीमध्येच रत असतो. त्याच्या मनात स्वतःसाठी कोणतीही आकांक्षा, लालसा राहत नाही. म्हणून 'सर्वभूतहिते रताः' म्हणजे सर्वांच्या कल्याणात रत राहणे एवढेच कर्म त्याच्याद्वारे घडत असते. अनवरत आनंद, सच्चिदानंद स्थिती, हाच त्याचा स्थायिभाव होतो.

जीवात्मा जेव्हा शरीर धारण करतो त्या वेळी तो या प्रकृतीच्या अधीन होतो. या गुणांना न धारण करणारी व्यक्ती या पृथ्वीवर नाही व स्वर्गलोकातही नाही. असे असले तरी साधनेच्या बळावर गुणातीत होण्याची सिद्धी मनुष्य प्राप्त करून घेऊ शकतो. प्रथम तमोगुणातून बाहेर पडले पाहिजे. नंतर रजोगुणातून मुक्त होऊन सत्त्वगुणात आले पाहिजे व पुढे पुढे सत्त्वगुणालाही सोडता आले पाहिजे. बुद्धी जेव्हा सत्त्वगुणात असते त्याच वेळी ती सत्कर्मासाठी जागृत असते. रजोगुणी व तामसगुणी यांच्या जीवनात शांती नसते. जिथे अव्यवस्थता, अस्थैर्य, असमतोलता, अनिर्बंधता असते तेथे हे दोन गुण प्रकर्षाने प्रभावी असतात. पशु-पक्ष्यांतसुद्धा या तिन्ही गुणांचा प्रभाव असतो. गाय ही सात्त्विक तर कोल्हा राजसिक व डुक्कर तामसिक म्हणता येईल. काही मधमाश्यांना राजसिक म्हणता येईल, कारण त्या केवळ मध गोळा करण्याचे काम करत असतात तर काही माश्या केवळ घाणीवरच बसत असतात. त्या तामसी प्रकृतीच्या असतात. डुकराला कितीही स्वच्छ ठेवले तरी चिखलात व घाणीत लोळण्यामध्ये स्वर्गसुख मानणाऱ्या यांना सात्त्विक कोण म्हणेल? प्राण्यांमध्येसुद्धा हे तीन गुण असतात, पण गुणातीत होण्याची बुद्धी भगवंतांनी त्यांच्यात ठेवली नाही. केवळ मनुष्यच गुण बदलू शकतो व गुणातीतसुद्धा होऊ शकतो. अर्जुनाच्या प्रश्नावरून भगवंत इथे गुणातीताची लक्षणे सांगत आहेत. गुणातीत मनुष्य गुणांच्या अधीन तरी नसतोच पण प्रकृतीवशात गुणात जरी सापडला तरी गुण त्याला चिकटत नाहीत. कोणत्याही गुणाच्या उत्कर्षाने त्याचे चित्त संभ्रमित होत नाही. सूर्याला प्रातःकाल,

मध्यान्हकाल किंवा सायंकाल या तिन्ही कालांची गणना नसते तसा तो गुणातीत पुरुष असतो. सात्त्विक गुण सत्कर्मे करतो, रजोगुणी ईषणायुक्त कर्मे करतो व तमोगुणी मोहादिक तामसी कर्मे करतो, पण गुणातीत पुरुषाच्या सर्व क्रिया त्याच्या सत्तेने चालतात. जसे चंद्रामुळे समुद्राला भरती येते पण चंद्र अकर्मी राहतो, वारा वाहतो पण आकाश स्थिर असते, रात्री-दिवस होत असतात पण आकाशाला त्याचे काही सोयरसुतक नसते तसे गुणातीत सर्व कर्मांच्या बाबतीत उदासीन असतो. 'विचरे विश्व होऊनी विश्वामाजी' अशी त्याची अवस्था असते. आत्मौपम्य दृष्टीनी तो जगाकडे पाहत असतो. संपूर्ण चराचर विश्व मद्रूप आहे असे तो पाहतो. आत्म्याच्या ठिकाणी रममाण झालेल्या अशा गुणातीत पुरुषास, देहात्मक असलेली सुख-दुःखादी सर्व द्वंद्वे सारखीच असतात. रत्न व दगड यामध्ये काहीही भेद त्याला दिसत नाही. स्तुती-निंदा, मानापमान, यश-अपयश, प्रिय-अप्रिय यामुळे त्याच्या आत्मस्थितीत काहीही बदल होत नाही. सर्व प्रकारचे कर्मारंभ त्याच्यापासून दूर असतात. प्रकृती आपल्या स्वभावधर्मानुसार कर्मे करीत असते अशी पक्की धारणा करून, अलिप्तभावनेने व कर्मारंभ न करता तो कर्म करीत असतो. प्रारब्धाने जे सहज प्राप्त होईल त्याचेच सेवन तो करतो. ही जीवनमुक्ताची अवस्था असते. आशा-अपेक्षा, लालसा काहीही नसल्यामुळे अशा निर्विकार, निर्विषय व निर्विचार स्थितीत केवळ शांती व आनंद याचा तो अनुभव घेतो. हा आनंद कसा असतो त्याचे प्रत्यंतर जगज्जेत्या सिकंदराला भारतात आले. सिकंदर जेव्हा हिंदुस्थानची यात्रा करत होता तेव्हा नदीच्या किनारी एका उंच शिलाखंडावर साधना करीत बसलेला एक साधू त्याला दिसला. आपल्याच तंद्रीत देहभान हरपलेल्या त्या साधूकडे सिकंदर बादशहा गेला. आधीच हिंदुस्थानावर आक्रमण करून विजेत्या झालेल्या बादशहाने, त्या साधूला सर्व प्रकारे विनवून सांगितले की, त्याने आपल्याबरोबर आपल्या देशाला यावे. सिकंदराने त्याची मुक्तकंठाने स्तुतीही केली व शेवटी म्हणाला, "मी आपल्याला काही मदत करू का, हे कृपया आपण सांगावे." पण त्या अविचल साधूवर कोणताही परिणाम झाला नाही. ते आपल्याच समाधी अवस्थेत डुंबून गेले होते. शेवटी सिकंदर बादशहाने त्याला म्हटले, "मी आपल्यासाठी काही काम करू इच्छितो." तेव्हा तो साधू म्हणाला, "बस, एवढेच कर. सूर्यप्रकाशाच्या आड तू जो उभा आहेस त्यापासून थोडा दूर जा व जे काही बोलायचे ते बोल. पण मला माझ्या आनंदात मग्न राहू दे." जगज्जेता सिकंदर कोणताही मोह, आमिष, लोभ त्या साधूला दाखवून त्याला परावृत्त करू शकला नाही.



अकबर बादशहालासुद्धा असाच कटू अनुभव घ्यावा लागला. कवी गंग भगवंताच्या भक्तीत रमून गेले होते. भावातीत होऊन प्रभूचे गुणगान गाण्यात धन्यता मानत होते. भगवंताशिवाय कशाचेही भान त्यांना राहिले नव्हते. सुरुवातीला जेव्हा कविता करायचे, त्या वेळी लौकिक जीवनातील घटना व मनुष्याची स्तुती त्यांच्या काव्यात असायची. जेव्हा भक्ती परम सीमेला पोहोचली तेव्हा भगवंताशिवाय काहीही आवडेनासे झाले. तेव्हा काही लोक अकबर बादशहाकडे आले व त्यांनी तक्रार केली की, कवी गंग बादशहाची स्तुती करत नाही उलट बादशहाविरुद्ध लोकांची मने कलुषित करतो. बादशहाने त्याला दरबारात बोलावून याचा पडताळा करावा. कवी गंगला बादशहाची स्तुती करण्यास सांगावे. त्याप्रमाणे अकबर बादशहाने कवी गंगला राजदरबारात बोलावले. शिपायांनी जेव्हा गंगला दरबारात उभे केले तेव्हा राजाने त्याला आपल्या स्तुतीपर काव्य रचण्याची आज्ञा केली. त्या वेळी कवी गंगने उत्तर दिले, "मी मनुष्याची स्तुती करीत नाही तर मनुष्याला निर्माण करणाऱ्या त्या भगवंताची स्तुती करतो. ती जर ऐकायची असेल तर मी ती सादर करायला तयार आहे." सर्व दरबार अवाक् झाला. दरबारीयांच्या सूचनेनुसार त्याला हत्तीच्या पायाखाली तुडवून ठार करावे असे फर्मावण्यात आले. ज्या वेळी तो मस्तवाल हत्ती गंगवर सोडण्यात आला त्याहीवेळी त्याने कविता रचली, "चाह भई परमेश्वर की, कवि गंग को लेन गणेश पठायो" - परमेश्वराची इच्छाच अशी आहे की, कवी गंगला घेण्यासाठी त्याने हत्तीरूपी गणेशाला पाठविले. ही त्याची कविता ऐकून बादशहाच्याही डोळ्यात अश्रू आले. आपल्याकडून भगवंताच्या भक्ताचा घोर अपमान झाला म्हणून त्याने खूप पश्चात्ताप केला.

भगवंतमय झालेल्या गुणातीत भक्ताची ही कथा सर्वच संत-महात्म्यांची कथा आहे. बाराव्या अध्यायातील भक्ताचे ३६ गुण, तेराव्या अध्यायातील ज्ञानी पुरुषाची लक्षणे, सोळाव्या अध्यायातील दैवी संपत्ती व या अध्यायातील गुणातीताची लक्षणे ही सर्व भगवंताच्या लाडक्या भक्ताची लक्षणे आहेत.

नंतर गुणातीत होण्याचा मार्ग म्हणून या अध्यायात भगवंत सांगतात -

**मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।**
**स गुणान्समतीत्यैतान्ब्रह्मभूयाय कल्पते ।।२६।।**

"आणि जो (सर्व कर्मे मलाच अर्पण करण्याच्या) अव्यभिचारी म्हणजे एकनिष्ठ-अनन्य भक्तियोगाने माझी सेवा करतो, तो या तीन गुणांच्या पलीकडे जाऊन ब्रह्मभूतावस्था प्राप्त करून घेण्यास समर्थ होतो." ।।२६।।

केवळ अनन्यभक्तीने जो भगवंताची उपासना करतो, तोच गुणातीत होऊन ब्रह्मत्व प्राप्त करून घेण्यास समर्थ होतो. कारण संपूर्ण शरणागत होऊन, मन-बुद्धी प्रभूला समर्पित करून भगवंतांनी दर्शविलेल्या निष्काम कर्माच्या मार्गाने तो वाटचाल करतो. असा भक्त गुणाच्या पलीकडे जातो. संपूर्ण विश्वात भगवंत भरून उरला आहे, त्याच्याशिवाय कोठेही काहीही दुसरे नाही, अशी अभेद दृष्टी अशा भक्ताच्या ठायी येते. अशी भक्तीच अव्यभिचारी भक्ती! अशा भक्ताची वृत्ती अखंड ब्रह्ममय असते. म्हणजे जेथून वृत्ती उत्पन्न होते तेही ब्रह्म, ज्याला विषय करते तेही ब्रह्म, व वृत्तीही ब्रह्म, अशी त्याची ही त्रिपुटी एक ब्रह्मरूपच असते. या श्लोकावर निरूपण करीत असताना श्री ज्ञानेश्वरांनी इथे भक्तीची व्याख्याच केली आहे. ते म्हणतात -

**पैं परमाणु भूतळीं, हिमकणु हिमाचळीं ।**
**मजमाजी न्याहाळी । अहं तैसें ।।३८५।।**
**हो का तरंगु लहानु । परी सिंधूसी नाही भिन्नु ।**
**तैसा ईश्वरी मी आनु । नोहेचि गा ।।३८६।।**
**ऐसेनि या समरसें । दृष्टि जें उल्हासें ।**
**ते भक्ति पैं ऐसें । आम्ही म्हणों ।।३८७।।**

"पृथ्वीवर असलेला अल्प परमाणू जसा पृथ्वीरूपच आहे अथवा बर्फाचा कण जसा बर्फाच्याच पर्वतरूप आहे. त्याचप्रमाणे (तू आपला मीपणा माझ्या ठिकाणी) पाहा." ।।३८५।।

"समुद्रावरची लाट जरी लहान असली तरी ती समुद्राहून वेगळी नाही. तसा मी ईश्वराच्या ठिकाणी दुसरा (ईश्वराहून वेगळा) खरोखर नाही." ।।३८६।।

"तेव्हा अर्जुना! अशा ऐक्याने जेव्हा दृष्टी विकसित होईल, तिलाच आम्ही भक्ती असे म्हणतो." ।।३८७।।

हेच सर्व योगांचे व ज्ञानाचे सार आहे असे माऊली म्हणते. प्रतिबिंबापासून बिंबापर्यंत जसा प्रभेचा एकसारखा सरळपणा असतो तशी ही 'सोऽहं' वृत्ती आहे. भक्त व भगवंताचे अशा प्रकारे ऐक्यच होऊन जाते.

शेवटी भगवंत भगवत्स्वरूपाचा महिमा सांगतात -

**ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहममृतस्याव्ययस्य च ।**
**शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकांतिकस्य च ।।२७।।**

"कारण, मीच अमृत व अव्यय ब्रह्माचे, शाश्वत धर्माचे व एकान्तिक म्हणजे परमावधीच्या अत्यंत सुखाचे अखेरचे स्थान आहे." ।।२७।।



जसा सूर्याच्या ठिकाणी ज़गातला सर्व प्रकाश घनीभूत झालेला असतो, तसे सर्व तेज व आनंद भगवंताच्या ठिकाणी घनीभूत झालेले आहे. अमृत म्हणजे मोक्ष व आत्यंतिक आनंद हाच आहे. मोक्ष, शाश्वत धर्म, चिदानंद, सर्व काही तोच आहे.

त्रिगुणांनी हे जग कसे व्यापले आहे ते, आणि या त्रिगुणांच्या प्रभावातून सुटण्याचा सोपा मार्ग कोणता, या दोन्ही गोष्टी भगवंतांनी या अध्यायात सांगितल्या आहेत.

**।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**

## अध्याय पंधरावा
## पुरुषोत्तमयोग

पंधरावा अध्याय म्हणजे गीतेच्या संपूर्ण विचारांचा सारभूत अमृतकुंभच! तेराव्या अध्यायात भगवंतांनी क्षेत्र-क्षेत्रज्ञ विचाराला जोडून प्रकृति-पुरुष-विवेक सांगितला. बहिर्निष्ठता सोडून अंतर्निष्ठता धारण करण्यातच मनुष्याचे कल्याण आहे, देहात्मकता सोडून आत्मलाभ करणे हेच मनुष्यजन्माचे उद्दिष्ट आहे, व त्यासाठी देहापासून आत्मा पूर्णपणे वेगळे तत्त्व आहे, हे सत्य समजण्याची आवश्यकता आहे, हे या अध्यायात सांगितले. चौदाव्या अध्यायात प्रकृतीच्या सत्त्व, रज, तम या तीन गुणांनी मनुष्या-मनुष्यामध्ये स्वभावभेद कसा उत्पन्न होतो, 'गुणातीतावस्था' किंवा अध्यात्मदृष्ट्या ब्राह्मी स्थिती म्हणजे काय व ती कशी प्राप्त करावी याचे विवेचन केले. आता पंधराव्या अध्यायात संसाराचे म्हणजे जगाचे खरे रूप सांगून जन्ममरणाच्या ह्या फेऱ्यातून मुक्त होण्याचा उपाय काय हे सांगितले आहे. जीवाचा जगाशी तसेच ईश्वराशी संबंध आणि ईश्वराचे 'पुरुषोत्तम' रूप यांचे विवेचन या अध्यायात भगवंतांनी केले आहे. गुह्यातले गुह्य शास्त्र समजावून सांगितले आहे. हा अध्याय म्हणजे संपूर्ण गीतेचे सार होय.

ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ।
छन्दांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ।।१।।
अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः ।
अधश्च मूलान्यनुसन्ततानि कर्मानुबन्धीनि मनुष्यलोके ।।२।।
न रूपमस्येह तथोपलभ्यते नान्तो न चादिर्न च सम्प्रतिष्ठा ।
अश्वत्थमेनं सुविरूढमूल मसङ्गशस्त्रेण दृढेन छित्त्वा ।।३।।
ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन्गता न निवर्तन्ति भूयः ।
तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ।।४।।
निर्मानमोहा जितसङ्गदोषा अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः ।
द्वन्द्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैर्गच्छन्त्यमूढाः पदमव्ययं तत् ।।५।।
न तद्भासयते सूर्यो न शशाङ्को न पावकः ।
यद्गत्वा न निर्वतन्ते तद्धाम परमं मम ।।६।।



श्री भगवान म्हणाले, "हे अर्जुना! हा संसार म्हणजे अविनाशी असा अश्वत्थ वृक्ष आहे, असे म्हटले जाते. त्याची मुळे वरच्या बाजूस असून फांद्या खाली आहेत. वेद ही त्याची पाने आहेत. हे वृक्ष ज्याने समग्र रूपात जाणले, तोच वेद जाणणारा म्हणजे ज्ञानी होय." ।।१।।

"या वृक्षाच्या फांद्या वर-खाली सर्वत्र पसरलेल्या आहेत. सत्त्व, रज, तम या तिन्ही गुणांच्या पाण्याने त्या वाढलेल्या आहेत. विषय ही त्याची कोवळी पालवी. मनुष्यलोकात कर्मबंधनात बांधणारी या झाडाची मुळे खाली व वर सर्वत्र पसरलेली आहेत." ।।२।।

"या वृक्षाचे रूप जसे वर्णन केले, तसे येथे आढळत नाही. कारण याला आदि नाही, अंत नाही किंवा याचे आधारस्थानही सापडत नाही. अत्यंत खोल गेलेल्या मुळांचा हा अश्वत्थ वृक्ष अनासक्तिरूप बळकट कुऱ्हाडीनेच तोडून टाकला आहे." ।।३।।

"त्यानंतर त्या परमपदाचा शोध घ्यावा, जेथे गेल्यानंतर पुन्हा या संसारात यावे लागत नाही. 'ज्याच्यापासून या पुरातन संसारवृक्षाची प्रवृत्ती विस्तार पावली आहे, त्याच आदिपुरुषाला मी शरण आलो आहे.' (असा मनात दृढ भाव ठेवून त्या मोक्षपदाचा शोध घ्यावा.)" ।।४।।

"अहंकार व मोह यांनी जे रहित आहेत. 'आसक्ती' हा दोष ज्यांनी जिंकला. जे नित्य आत्मचिंतनात तत्पर आहेत, ज्यांची विषयेच्छा पूर्णपणे नाहीशी झाली, जे सुख-दुःख नावाच्या द्वंद्वांपासून पूर्णपणे मुक्त झाले, असे ज्ञानी जन त्या अविनाशी परम पदाला पोहोचतात." ।।५।।

"जे परमपद मिळाल्यावर माणसे संसारात परत येत नाहीत, ते माझे परमधाम आहे. त्याला सूर्य, चंद्र किंवा अग्नी प्रकाशित करीत नाही. (ते स्वयंप्रकाशी आहे.)" ।।६।।

विवरण : ह्या सहा श्लोकांत भगवंतांनी संसाराचे खरे रूप सांगितले आहे. तसेच ह्यांपासून मुक्तीचा उपायही सांगितला आहे. इथे संसार म्हणजे प्रपंच किंवा मुलाबाळांसमवेत होणारा नित्य व्यवहार असा प्रचलित अर्थ नसून जग व त्यात चालणारा जन्ममरणाचा फेरा हा अर्थ विवक्षित आहे.

भगवान म्हणतात की, हा संसार एखाद्या वृक्षाप्रमाणे आहे. पण हा चमत्कारिक वृक्ष आहे की ज्याचे मूळ खाली नसून वर आहे आणि फांद्या खाली आहेत. मूळ वर आहे याचा अर्थ असा की, त्याची उत्पत्ती ईश्वरापासून झाली आहे.

ह्या संसारवृक्षाला भगवंतांनी 'अश्वत्थ' असे म्हटले आहे आणि 'अव्यय' ही. 'अश्वत्थ' शब्दाचे दोन अर्थ असतात. एक म्हणजे 'पिंपळ'. पिंपळ हा

एक पवित्र वृक्ष आहे. गीतेत भगवंतांनी पिंपळ वृक्षाला आपली विभूती मानली आहे. - 'अश्वत्थः सर्ववृक्षाणां' (गीता १०.२६) प्राचीन ग्रंथात संसाराचे वर्णन औदुंबर, वड किंवा पिंपळ वृक्षाच्या रूपकाने केलेले आढळते.

'अश्वत्थ' या शब्दाचा दुसरा अर्थ आहे - 'जे उद्या टिकणार नाही'. ('श्व' म्हणजे 'उद्या', 'अ' म्हणजे 'नाही' आणि 'त्थ' म्हणजे 'टिकणार'). हा संसार दरघडीस पालटणार असल्याने तो 'अश्वत्थ' आहे असे म्हटले जाते. ही अनित्यता संसाराचे मूलभूत लक्षण आहे. पण त्याचबरोबर ह्या अनित्य रूपात हा संसार अनादिकाळापासून चालत येत आहे आणि ह्याचा अंत कधी होईल असेही ध्यानात येत नाही. म्हणूनच याला 'अव्यय' अर्थात 'अविनाशी' असेही म्हणतात. इथे अभिव्यक्तीचे चक्र कधी थांबत नाही. भूतांचा प्रभव, प्रलय, पुनःप्रभव, पुनःप्रलय असे चक्र सारखे चालूच राहते. श्री ज्ञानेश्वर माऊलींच्या शब्दांत,

**एक देहाची डिरी तुटे । तंव देहांकुटी बहुवी फुटें ।**
**ऐसेनि भवतरू हा वाटे । अव्यय ऐसा ।।१३२।।**

"या संसारवृक्षाची एक देहरूपी डहाळी तुटते तोच त्या ठिकाणी पुष्कळ देहरूप अंकुर उत्पन्न होतात. त्यामुळे हा संसारवृक्ष अव्यय आहे असे वाटते." ।।१३२।।

हा संसार एका प्रवाहासारखा आहे. आणि म्हणून प्रत्येक क्षणी बदलत राहत असूनही आपल्याला तसा बोध होत नाही.

श्री ज्ञानेश्वर म्हणतात,

**जैसे वाहते पाणी जाय वेगे । तैसे आणिक मिळे मागे ।**
**येथे असंतचि असिजे जगे । मानिजे संत ।।१३३।।**

"ज्याप्रमाणे प्रवाहाचा एक लोट पुढे जातो, तोच मागून दुसरा लोट येतो; ते एका मागून एक येणारे लोट निरनिराळे असले तरी पाण्याचा अखंड एक प्रवाह दिसतो. त्याचप्रमाणे हा संसारवृक्ष क्षणोक्षणी नाश पावतो व उत्पन्न होतो. तरी उत्पत्ती-नाशाच्या वेगामुळे तो अखंड एकरूप असल्यासारखा वाटतो." ।।१३३।।

'अश्वत्थ' आणि 'अव्यय' संसार वृक्षाचे हे किती सुंदर व यथार्थ वर्णन भगवंतांनी केले आहे!

वृक्षामध्ये जशी पाने प्रकट होऊन त्याला सुशोभित करतात तसेच वेदांच्या रूपात संसारात ज्ञान प्रकट झाले आहे. म्हणूनच वेदांना भगवंतांनी संसार-वृक्षाची पाने म्हटले आहे. पण त्या बरोबरच भगवंत म्हणतात की, खरा वेदवेत्ता किंवा ज्ञानी तोच आहे जो ह्या संसारवृक्षाला समग्र रूपात



जाणतो, अर्थात ह्यात स्थित असलेल्या निरंतर बदलणाऱ्या मायारूपी अचेतन 'प्रकृती'बद्दल, तसेच जीवरूपी चेतन तत्त्व 'पुरुषा'बद्दल, आणि या दोन्हीच्याही पलीकडे असलेल्या 'पुरुषोत्तम' म्हणजे ह्या संसारवृक्षाचा मूळ असणारा सर्वेश्वर भगवंताबद्दलही जाणतो. असा ज्ञानी संसारात राहत असूनही 'जीवनमुक्त' स्थितीत जगू शकतो आणि देह सुटल्यावर 'परमपद' प्राप्त करून जन्ममरण चक्रापासूनच मुक्त होऊ शकतो.

या संसारवृक्षाबद्दल आणखी स्पष्ट करताना भगवंत म्हणतात की, भिन्न-भिन्न असंख्य योनींच्या रूपात या संसारवृक्षाच्या शाखा, वर आणि खाली, दोन्हीं बाजूंना पसरल्या आहेत. 'वर' म्हणजे देवयोनींच्या रूपात, आणि 'खाली' म्हणजे मनुष्य व पशुपक्षादी योनींच्या रूपात. सत्त्व, रज, तम प्रकृतीच्या या तीन गुणांमुळेच हा वृक्ष वाढत असतो. खरे म्हणजे संसार या तीन गुणांचाच खेळ आहे. - 'गुणा गुणेषु वर्तन्तः' (गीता ३.२८). शब्द, स्पर्श, रस, रूप व गंध, जीवांना मोहग्रस्त करणारे हे इंद्रियग्राह्य विषय, संसारवृक्षाच्या शाखांत जणू कोवळी पालवी म्हणून प्रकट झाले आहेत. मनुष्यलोकात कर्मबंधनात बांधणारी अहंता, ममता आणि कामना-रूप वासना या शाखांतून निघणारी मुळे आहेत आणि तीही खाली व वर सर्वत्रच पसरली आहेत.

देवयोनी किंवा पशुपक्ष्यादी योनी ह्या तर भोगयोनी आहेत. म्हणून तिथे होणाऱ्या कर्मांमुळे नवे कर्मबंधन होत नाही. परंतु मनुष्ययोनी 'कर्मानुबन्धीनि' आहे, अर्थात ह्या योनीत केल्या गेलेल्या कर्मांचे पापपुण्यरूपी फळ मिळते. इथे केल्या गेलेल्या कर्मानुसार मृत्यूनंतर मनुष्याचा पुढचा जन्म मनुष्य-योनीत किंवा त्याच्या वरच्या योनीत म्हणजे देवयोनीत किंवा खालच्या योनीत म्हणजे पशुपक्षी इ. योनीत होऊ शकतो किंवा संसारवृक्षाला छेदून तो सर्वांत वर, परमात्म्यापर्यंतही जाऊ शकतो. संसारवृक्षाचा उच्छेद करण्याचा हा सुयोग फक्त मनुष्ययोनीतच मिळत असतो. पण तरीही लोक या सुयोगाचा उपयोग करीत नाहीत... हेच संसाराचे सर्वांत मोठे आश्चर्य होय!

खरे म्हणजे संसारवृक्षाशी आपला जो संबंध आहे तो फक्त आपण मानलेला आहे. क्षणोक्षणी बदलणाऱ्या या वृक्षाचे वास्तविक अस्तित्वच नाही. तो फक्त भगवंताची माया म्हणजे देखावा आहे. उलटपक्षी जीवात्मा हा नित्य तत्त्व आणि सर्वेश्वर परमात्म्याचा साक्षात अंश आहे. पण गंमत अशी की मायेच्या ह्या खेळात आसक्त होऊन जीवात्म्याने आपले सच्चिदानंद आत्मस्वरूप विसरलेले असते. आणि ही आसक्ती दृढमूल झाल्यामुळे तो अगतिक होऊन दुःखी-व्याकुळ स्थितीत जन्म-मरणाच्या चक्रात फिरत राहतो. मनुष्याकडून हे जणू स्वतःच स्वतःशी शत्रूसारखे वागणे होय.

''यथा पिण्डे तथा ब्रह्मांडे, यथा ब्रह्मांडे तथा पिण्डे'', 'जे पिंडी ते ब्रह्मांडी व जे ब्रह्मांडी ते पिंडी' असे म्हणतात. आपण आपल्या शरीराला जरी वृक्ष मानले तरी या अश्वत्थ वृक्षाची प्रचिती आपल्याला येईल. आपण मुखावाटे अन्न ग्रहण करतो व वृक्ष जमिनीतून अन्न ग्रहण करतात. आपले हात, पाय, बोटे, अंग-प्रत्यंग हे मात्र खाली जमिनीच्या दिशेने पसरले आहेत. आपणसुद्धा त्या अविनाशी परमात्म्याचे अंश आहोत. म्हणून आपले मूळ अविनाशी तत्त्वाने बनले आहे. आपल्यातील ऊर्जा, प्रकाश हे सर्व वेदरूपी पानांपासून आपल्याला मिळतात. वेद म्हणजे ज्ञान. या ज्ञानापासूनच आपली जीवनशक्ती कार्यरत होते. जेव्हा या ज्ञानाचा अभाव असतो तेव्हाच मनुष्य दुःखीकष्टी होतो. अशा वृक्षाला जाणून मनुष्य अविरत आनंद भोगू शकतो. जर त्याला जाणले नाही, तरच मनुष्य कर्मबंधनात अडकून संसारक्लेश भोगतो. मनुष्य स्वतःच आपल्या बंधनाला कारण आहे. जसे भुंगा आपल्या कौशल्याने व शक्तीने कठीण लाकडालासुद्धा छिद्रे पाडतो पण सूर्यास्ताच्या वेळी कोमल कमलपुष्पात जेव्हा शिरतो तेव्हा त्या बंद पाकळ्यात स्वतःच अडकून पडतो. तेथेच तो प्राणाला मुकतो पण कमलपाकळ्या तोडून बाहेर पडत नाही. मोहबंधनात अडकून स्वतःच स्वतःच्या नाशाला कारणीभूत ठरतो. संसाराच्या मोहपाशात, अज्ञानाने राहणाऱ्या बद्ध जीवांनादेखील दुःख व नाश याच्याशिवाय काहीही मिळत नाही म्हणून भगवंत सांगतात की, ज्ञान हेच एकमात्र जीवाला बंधनातून व दुःखातून सोडविण्याचे साधन आहे. मोह, अहंकार, वासना तोडण्यासाठी ज्ञानाची आवश्यकता आहे. बुद्धीने हा संसार समजला पाहिजे. मनुष्य आपल्या काही दोषपर प्रवृत्तींनी आपलाच सर्वनाश ओढवून घेतो. काही कामना सुरुवातीला गरजेनुसार येतात पण आवश्यकता संपली तरी त्या सुटत नाहीत म्हणून कामनांचे स्वरूप बुद्धीने जाणून त्यातून सुटण्याचा मार्ग शोधला पाहिजे. काही मोह पुनःपुन्हा होतात व या पुनरावृत्तीने त्याला सवयीचे स्वरूप प्राप्त होते. प्रपंचात असणाऱ्या इंद्रियभोगापासून अखंड सुखाची प्राप्ती कदापि होत नाही. त्यामुळे हे भोग पुनःपुन्हा सारखे घ्यावे वाटतात. इच्छा, वासना यांचे आकर्षण मनुष्याला बंधनात टाकते. एक इच्छा पूर्ण झाली की, त्या पूर्ततेतच दुसऱ्या इच्छेचा जन्म होतो. इच्छामागून इच्छांची साखळी कधी संपत नाही. इंद्रियांची भूक कधी मिटत नाही. जे मिळविले त्याबद्दलही समाधान नसते पण जे मिळाले नाही त्यामुळे अतृप्ती मात्र राहते. ही अतृप्ती स्वस्थ बसू देत नाही. पुनःपुन्हा नवे हव्यास, नव्या आशा-आकांक्षा... सारे आयुष्य अशा तृप्ती-अतृप्तीच्या भोवऱ्यात सापडते व आनंदाची एक लहरसुद्धा प्राप्त होत नाही.



म्हणून बुद्धीने हे विकारांचे स्वरूप, त्यातील अनित्यता हे जाणून घेतले पाहिजे. भक्तीमध्ये असे अशांत मन राहत नाही. ज्ञानामुळे बुद्धी अस्थिर राहत नाही. शाश्वत सुखाचा ध्यास एकदा लागला की, भोग-विषयात मन रममाण होत नाही. साऱ्या ब्रह्मांडात तो सुखनिधान असणारा परमात्मा भरून उरला आहे. जसा ब्रह्मांडात आहे तसाच तो आपल्या पिंडातही आहे. संपूर्ण संसाराचे मूळ हाच परमात्मा आहे. या मुळाला पकडले की बंधन संपले, येरझाऱ्या संपल्या व दुःखही संपले. या परमात्म्याच्या कृपेच्या एका थेंबानेही हे जीवन पावन होऊ शकते. ज्याने आपल्या जीवनाचा स्रोत, त्या परमशक्तीशी जोडला त्याला प्रसन्नता प्राप्त होते. तो कर्मयोनी व भोगयोनी यातून मुक्त होऊ शकतो. असे उन्नत जीवन प्राप्त झाले की, संसाराच्या सतत परिवर्तनीय असणाऱ्या स्थितीपासून तो दूर राहतो. परमतत्त्व जसे अविचल, अपरिवर्तनीय असते तसे आत्मस्वरूपात तो स्थिर, शांत, तृप्त राहतो.

तर यावर उपाय आहे तरी काय? ह्या मायामय संसारवृक्षापासून मुक्त होऊन आपल्या सच्चिदानंद आत्मस्वरूपात आपली स्थिती कशी होईल? गीता म्हणते की, ह्यासाठी संसाराची आसक्ती सोडा आणि ह्या संसाराचे जे मूळ आहे त्या परम पुरुषास शरण जा. यासाठी गीतेत कर्मयोग, ज्ञानयोग, भक्तियोग हे मार्ग दिले आहेत. 'असंगशस्त्रेण दृढेन छित्त्वा' ('अनासक्तीरूपी शस्त्राद्वारे संसारवृक्षाचा दृढतेने उच्छेद करा') हा जो गीतोपदेश या अध्यायात आहे त्यामध्ये 'अ'कार हे वासुदेवाचे नाव आहे असे माना. 'असंग' अर्थात 'वासुदेवाशी संग' म्हणजे तुम्ही वासुदेवाची संगत करा! सातव्या अध्यायात भगवंतांनी म्हटलेच आहे, 'मय्यासक्तमनाः' (गीता ७.१) म्हणजे 'तुमच्या मनाला भगवंतात आसक्त करा.' मग संसाराप्रत तुमची फसवी आसक्ती आपोआप नाहीशी होईल...

असे केल्यास, तुमची जीवन-दृष्टीच बदलून जाईल. गीतोपदेश ऐकल्यानंतर अर्जुनाने भगवंताला सांगितले आहे - 'करिष्ये वचनं तव' (१८.७३) - 'मी तुमच्या म्हणण्याप्रमाणे करीन' - तुम्ही तेच करा. 'असक्तः सततं कार्यं कर्म समाचर' (३.१९) - 'आपली सर्व कर्तव्ये अनासक्त राहून उत्तम प्रकारे करा'. 'स्वकर्मणा तमभ्यर्च्य' (१८.४६) 'त्याला भगवंताची पूजा म्हणून करा'. कर्तव्य म्हणून केलेल्या अशा कर्माने तुम्हांला कोणतेही कर्मबंधन लागणार नाही. भगवंत म्हणतात, 'यो मां पश्यति सर्वत्र' (६.३०) - 'जो मला सर्वत्र पाहतो'; 'आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति' (६.३२) - 'जो इतरांनाही आपल्याप्रमाणेच सर्वत्र सारखे पाहतो'; 'मैत्र करुण एव च'

(१२.१३) - 'जो सर्वांप्रत मैत्रीभावाने वागतो, दया करतो' - अशी जीवनदृष्टी घेऊन जगण्याने जीवनाची सध्याची दुःखी-अशांत-अहंकारमय स्थिती निर्मल-प्रेममय-आनंदमय स्थितीत बदलून जाईल. हीच खरी 'जीवनमुक्त' स्थिती आहे. आणि मृत्यूनंतर परमात्म्याकडे पोहोचण्यामुळे जन्ममरण चक्रापासून त्याची कायमस्वरूपी सुटका होईल. संसारवृक्षाचा उच्छेद करण्याचा यापेक्षा सोपा, व्यावहारिक व मनोरम मार्ग आणखीन कोणताच नाही.

पाचव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, अशा ज्ञानी भक्ताच्या मनात मान (अहंता) आणि मोह (ममता) राहत नाहीत; कामना आणि सांसारिक आसक्तीही राहत नाही. भगवंताशी निरंतर जोडून राहिल्याने तो सुख-दुःख नामक द्वंद्वांपासून मुक्त राहतो. सुख, दुःख तर जीवनात राहतच असतात, राहतीलच - पण ती त्याला व्याकुल करत नाहीत, भगवद्शरण होऊन तो नेहमी समतेत आणि प्रसन्नतेत जगतो.

हे जे संसारवृक्षाचे मूळ आहे, भगवंताचे जे परमधाम आहे, ज्याला आपण 'परमपद' म्हणजे सर्वोच्च उपलब्धी असे म्हणतो ते कसे आहे?

भगवंत म्हणतात की, त्या 'धामा'ला सूर्य, चंद्र किंवा अग्नी प्रकाशित करत नाहीत. ते स्वयंप्रकाशी आहे. खरे म्हणजे, सूर्य, चंद्र, अग्नी आदी त्याच्या प्रकाशानेच प्रकाशित होते. 'तस्य भासा सर्वम् इदम् विभाति' (श्वेता. उप. ६.६.१४). भावार्थ असा की, भगवंत प्रकाशस्वरूप म्हणजे ज्ञानस्वरूप आहे आणि ते मायापती आहे. त्याच्याजवळ पोहोचल्यानंतर मायाजन्य अविद्या म्हणजे अज्ञानाचा स्पर्शच होत नाही. आणि म्हणून या मायिक जन्ममृत्युचक्रात परत यावेही लागत नाही.

असंख्य योनींच्या रूपात असलेल्या ह्या मायामय संसारवृक्षापासून मुक्त होण्याचा मार्गही भगवंतांनी दाखविला. संसाराविषयीची आसक्ती सोडून भगवंताची आसक्ती धरा व त्याला सर्वार्थाने शरण जा, असा उपदेश या अध्यायात केला आहे. जिथे आल्यानंतर पुन्हा मर्त्यलोकात जाणे नाही अशा परमधामाचे वर्णन केल्यानंतर भगवंत आता सातव्या श्लोकापासून जीवा-शिवाचा संबंध सांगत आहेत.

**ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ।**
**मनःषष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ।।७।।**
**शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः ।**
**गृहीत्वैतानि संयाति वायुर्गन्धानिवाशयात् ।।८।।**
**श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च ।**
**अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते ।।९।।**



**उत्क्रामन्तं स्थितं वापि भुञ्जानं वा गुणान्वितम् ।**
**विमूढा नानुपश्यन्ति पश्यन्ति ज्ञानचक्षुषः ।।१०।।**
**यतन्तो योगिनश्चैनं पश्यन्त्यात्मन्यवस्थितम् ।**
**यतन्तोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यन्त्यचेतसः ।।११।।**

''जीवलोकात असलेला जीवात्मा हा माझाच सनातन अंश आहे. तोच प्रकृतीत असलेली मनासह पाच ज्ञानेंद्रिये आकर्षण करीत असतो.'' ।।७।।

''वारा जसा गंधाच्या आश्रयस्थानापासून गंध (वास) घेऊन जातो, तशा प्रकारेच, देहादिकांचा स्वामी जीवात्मा जेव्हा पहिल्या शरीराला सोडून जातो, तेव्हा त्यातून मनासह या इंद्रियांना घेऊनच पुन्हा जे शरीर प्राप्त होते, त्यात जातो.'' ।।८।।

''हा जीवात्मा कान, डोळे, त्वचा, जीभ, नाक आणि मन यांच्या आश्रयानेच विषयांचा उपभोग घेतो.'' ।।९।।

''शरीर सोडून जाणाऱ्या, शरीरात राहणाऱ्या, विषयांचा उपभोग घेणाऱ्या किंवा तीन गुणांनी युक्त असलेल्या (जीवात्म्याला) अज्ञानी लोक जाणत नाहीत. केवळ ज्ञानाची दृष्टी मिळालेले ज्ञानी लोकच जाणतात.'' ।।१०।।

''योगीजन आपल्या हृदयात असलेल्या या आत्म्याला प्रयत्नानेच जाणतात. पण अंतःकरण शुद्ध नसलेली अज्ञानी माणसे प्रयत्न करूनही या आत्म्याला जाणत नाहीत.'' ।।११।।

'माझा सनातन अंशच जीवलोकात जीव बनून राहतो' हे भगवंताचे वचन फार महत्त्वाचे आहे. त्यात महान अर्थ भरलेला आहे. प्रत्येक जीव, त्याच्या आध्यात्मिक सत्य स्वरूपात ईश्वररूपच आहे. तो एकाच परम चैतन्य, सर्वव्याप्त, परम पुरुषाचा अज, अमर, सनातन अंश आहे. 'अंश' या शब्दाचा अर्थ 'एक भाग किंवा तुकडा' असा होतो. तो अर्थ येथे अभिप्रेत नाही. परमात्मा सर्वव्याप्त आहे, जसे आकाश. परंतु एखादा घडा तयार झाला की, त्याच्या आकारात सामावलेल्या आकाशाला आपण आकाशाचा घटाकार अंश म्हणतो. त्याचप्रमाणे देहाच्या आकारात असलेल्या परमात्मतत्त्वाला आपण परमात्म्याचा अंश म्हणतो. बाहेरच्या आकाशात आणि घटाकाशात जसा तत्त्वतः कोणताही फरक नाही, तसाच परमात्म्यात व जीवात्म्यात कोणताही फरक नाही.

हे शरीर पंचमहाभूतांनी बनलेले आहे. हे जरी नष्ट झाले तरी परमात्म्याचा हा अंश नाश पावत नाही. अंश अंशीकडे म्हणजे जीव परमात्म्याला जाऊन मिळतो. ''आत्मा देहात बद्ध असला म्हणजे त्यास जीवात्मा असे म्हणतात. आणि तोच प्रकृतीच्या किंवा देहाच्या गुणांपासून मुक्त झाला, म्हणजे त्यास परमात्मा ही संज्ञा आहे.'' (म. भा. शा. १८७.२३).

सर्व संतांनीही या हृदयस्थ चैतन्यतत्त्वालाच आळविले आहे. संत ज्ञानेश्वर म्हणतात,

**तैसा हृदयामध्ये मी रामु ।**
**असता सर्व सुखाचा आरामु ।**
**कीं भ्रांतासि कामु । विषयावरी ।।** (६-३७९)

"त्याप्रमाणे सर्व सुखाचे निधान असा जो मी राम, तो मी (सर्वांच्या) हृदयात असताना मूर्ख लोकच विषयांची इच्छा करतात."

श्री ज्ञानेश्वरांच्या पसायदानातील 'विश्वात्मक ईश्वराची कल्पना देखील हीच आहे. आपण 'अमृतस्य पुत्रः' असूनसुद्धा केवळ विषयांच्या आकर्षणामुळे आत डोकावून पाहत नाही. भगवंताचा अंश असूनही आपण या देहात्मकतेमुळे अज्ञानी राहतो. अक्षय, अनंत, अखंड आत्मशक्तीचा महान स्रोत शरीरात असूनही कर्मदरिद्र्याप्रमाणे वणवण फिरत राहतो. कस्तुरीमृगाप्रमाणे आपली अवस्था होते. अविद्येमुळे जीव आपल्या मूळ स्वरूपाला विसरून जन्म-मृत्यूच्या रहाटगाडग्यात अडकून पडतो.

आठव्या श्लोकात शरीरातील चैतन्य कसे निघून जाते याचे वर्णन आहे. देह पंचमहाभूतांचा बनलेला आहे. जीव या देहातून निघून जाताना मन व इंद्रिये आपल्याबरोबर नेतो. स्थूल देह मात्र पंचमहाभूतात विलीन होतो. पुष्पाचा सुगंध वारा घेऊन जातो, त्याचप्रमाणे देहपतनानंतर जीव सूक्ष्म शरीराला आपल्याबरोबर घेऊन जातो. हेच सूक्ष्म शरीर पुन्हा नव्या शरीरात प्रवेश करते. अन्तकाळी असलेल्या वासनानुसार व जन्मजन्मांतरीच्या संस्कारांची जी काही शिदोरी असेल, त्यानुसार जीवाला पुनर्जन्म प्राप्त होतो. हा क्रम अखंडपणे असाच चालू राहतो. म्हणून साधना म्हणजे अंतःकरणातील वासना-संस्कारांची बीजे नष्ट करण्याचा प्रयत्न असला पाहिजे. भगवंताजवळ मोक्षाचे म्हणून कोणते वेगळे गाठोडे नाही. इंद्रियांवर विजय मिळवून मनोनिग्रह करून निर्विषय होण्यासच मोक्ष म्हणतात. विषयवासनांचा क्षय झाल्यानेच हे जन्म-मृत्यूचे चक्र थांबू शकते. या मोक्ष प्राप्तीसाठी जीवात्म्याला पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये, पाच प्राण, मन व बुद्धी या घटकांचे सूक्ष्म शरीर व अविद्यारूप कारण शरीर यांपासून मुक्ती मिळविली पाहिजे. प्रकृतीच्या नियमानुसार स्थूल देह "अस्ति, जायते, वर्धते, विपरिणमते, अपक्षीयते व क्षीयते" या सहा स्थितींतून जातो व नष्ट होतो. पण आत असलेल्या सूक्ष्म शरीरातील संस्कार व वृत्ती नष्ट करण्यासाठी साधना व ज्ञानाची आवश्यकता आहे. ही संस्काररूपी बीजेच पुन्हा योग्य काळ आला की, अंकुरित होतात व नवा जन्म प्राप्त होतो.



मन हेच मोक्षाचे व बंधनाचे मुख्य कारण आहे. "मन एव मनुष्याणां कारणं बन्धमोक्षयोः।" असे वेदान्त यासाठीच सांगतो. गंमत अशी की, परमात्म्याची दिव्यता घेऊन जीव या संसारसागरात प्रवेश करतो पण मायेच्या बंधनातच अडकून राहतो. म्हणून जर कोणाला उन्नत करायचे असेल तर ते फक्त मनाला! सर्व संतांनी, ऋषिमुनींनी या मनाचा महिमा गायिला आहे. परमार्थात या मनाचीच साधना अपेक्षित आहे. संत तुकारामांनी मनाला गुरू मानले आहे. ते म्हणतात,

**मन करारे प्रसन्न । सर्व सिद्धीचे कारण ।**
**मोक्ष अथवा बंधन । सुख समाधान इच्छा ते ।।**
**मन गुरु आणि शिष्य । करी आपुलेचि दास्य ।**
**प्रसन्न आपआपणास । गती अथवा अधोगती ।।**

शेवटी ते म्हणतात की, या मनासारखे दुसरे दैवत नाही. संत रामदासांनी या मनाचे माहात्म्य सांगण्यासाठी २०५ श्लोक लिहिले. गीतेत भगवंतांनी भक्ताकडून केवळ त्याच्या मनाचीच मागणी केली आहे. "मन्मना भव" हाच गीतेचा आग्रह आहे.

नवव्या श्लोकात जीव विषयांचा उपभोग कसा घेतो हे सांगितले. मनासह श्रोत्र, चक्षु, इ. सहा इंद्रियांच्या मदतीने हा जीव विषय ग्रहण करतो.

दहाव्या व अकराव्या श्लोकात अशा आत्म्याला कोण पाहू शकतात याचे वर्णन आहे. हा जीवात्मा देहात राहून गुणांचा भोग घेताना अज्ञानी लोकांना दिसत नाही. कारण, केवळ ज्ञानाच्या दृष्टीलाच ते महान सत्य दिसू शकते. बहिर्मुख जाणिवेच्या मर्यादा जोपर्यंत हे अज्ञानी ओलांडत नाहीत, तोपर्यंत आतील ईश्वरतत्त्वाची अनुभूती त्यांना घेता येत नाही. अंतर्मुख होऊन आपल्या अंतःस्थ दिव्य शक्तीच्या जाणिवा संपन्न केल्या पाहिजेत. "पाहावे आपणांसी आपण । या नाव ज्ञान ।" अशी संत रामदासांनी आत्मज्ञानाची व्याख्या केली आहे. संसारसागरातून कोण तरतील याचेही उत्तर त्यांनी दिले आहे.

**अंतर्निष्ठ तितुके तरले । बहिर्निष्ठ ते बुडाले ।।**

हीच माणसे अध्यात्मदृष्टीने ज्ञानी होतात व ज्या योग्यांना ही ज्ञानदृष्टी लाभते, त्यांना त्यांच्या आत्म्याची नित्यता व अनंतता अनुभवता येते. अध्यात्मज्ञानाच्या प्रकाशात त्यांना स्वतःमधील ईश्वर दिसतो व 'आत्मौपम्य' दृष्टीने ते याच समभावाने जगाकडे पाहतात. सर्व विश्वात त्यांना ईश्वराचे दर्शन घडते. गीताकारांनी अशा ज्ञानचक्षुसंपन्न साधकांचे वर्णन या श्लोकात केले आहे. 'ज्ञानचक्षू' म्हणजे अभेदज्ञानाची दृष्टी! हे ज्ञान केव्हा प्राप्त होते,

हे सांगण्यासाठी भगवंतांनी 'यतन्तो' हा शब्दप्रयोग वापरला आहे. भगवंत म्हणतात की, जे युक्त म्हणजे जोडले जाणारे भक्त आहेत ते प्रयत्नशील योगी असतात. ते या आतील दिव्य चैतन्यशक्तीला आपल्या ज्ञानचक्षूमुळे ओळखतात. 'अकृतात्मान' म्हणजे विचारहीन व मलिन बुद्धीचे प्रयत्नवादी लोक! ते जरी आत्मरत होण्यासाठी साधना करतात, तरी असफलच होतात. त्यांना या आत्मशक्तीचा प्रत्यय येत नाही. चित्‌शक्ती ओळखण्यासाठी शास्त्रसम्मत मार्ग अनुसरला पाहिजे. शुद्ध बुद्धीत ईशतत्त्वाचा वास असतो. आत्मलाभाशिवाय दुसरे काहीही गोमटे नाही, अशी ज्याच्या बुद्धीची धारणा झाली तो भोगविषयात कधीही रमत नाही. अशा शुद्ध मन-बुद्धीने जेव्हा प्रयत्न होतात, तेव्हाच आत्मानंदाचा धनी होता येते. प्रयत्नशील पण 'अकृतात्मान' साधक परमार्थात उन्नत होऊ शकत नाही. दहाव्या व अकराव्या श्लोकावर निरूपण करताना श्री ज्ञानेश्वर माऊलींनी अशा सर्व विचारांचे सार खालील सुंदर ओव्यांत सांगितले आहे. अंतर्यामी असणाऱ्या भगवंताची भेट नेमकी कोणाला होते, याचे उत्तर या सारभूत ओव्यांत आहे -

**पैं तोंड भरो कां विचारा ।**
**आणि अंतःकरणी विषयासी थारा ।**
**तरी नातुडे धनुर्धरा । त्रिशुद्धी मी ।।३९३।।**
**तैसा चित्ती अहंते ठावो ।**
**आणि जिभे सकळ शास्त्रांचा सरावो ।**
**ऐसेनी कोडी एक जन्म जावो ।**
**परी न पविजे माते ।।३९६।।**

"अर्जुना! कितीही विचाराने (ज्ञानाने) तोंड भरलेले असेना का, परंतु जर अंतःकरणामध्ये विषयांना आश्रय मिळत असेल तर मी निश्चयेकरून त्याला सापडणार नाही." ।।३९३।।

"त्याप्रमाणे चित्तामध्ये अहंकार आहे व जिभेवर सकळ शास्त्रांचा अभ्यास आहे. अशा तऱ्हेने कोट्यवधी जरी जन्म गेले तरी अशा पुरुषास, माझ्या स्वरूपाची प्राप्ती करून घेता यावयाची नाही." ।।३९६।।

हेच परमार्थाचे सार आहे. म्हणून भक्ती हे केवळ कर्मकांड नाही तर भक्ती म्हणजे वृत्ती! अंतर्बाह्य बदल होणे हे भक्तीत अपेक्षित आहे. केवळ ज्ञानाने भगवंताची भेट होणार नाही. अंतःकरणातील दृढभाव व बुद्धीची स्थिरता यामुळेच भगवंताशी जोडले जाऊ शकते.

हे पाचही श्लोक पारमार्थिक दृष्टीने मांगलिक आहेत. कारण भगवंतांनी येथे आपला नेमका पत्ता सांगितला आहे. पूजा, पूजेची साधने व भक्तीचा



खरा अर्थ येथे विशद झाला आहे. भगवंताला आतच शोधावयाचे आहे. शुद्ध, सात्त्विक अंतःकरणातच भगवंताचे दर्शन होते.

या सर्व सृष्टीमध्ये व सर्व प्राणिमात्रांमध्ये भगवंत चैतन्यरूपाने वास करीत असल्याने सारी सृष्टी हीच त्याच्या पूजेची साधने आहेत. "जे जे भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत ।।"

अशी दृष्टी आली की, सारी सृष्टीच मग भगवंतमय वाटायला लागते. गीतेत ही महान शिकवण भगवंतांनी दिली आहे.

भूतमात्रामध्ये तो चैतन्यरूपाने वास करीत असल्याने सारे जगत हेच जगदीशाच्या पूजेचे साधन आहे. हा भक्तीचा अर्थ या पाच श्लोकांत विशद केला आहे.

आता बाराव्या श्लोकापासून पंधराव्या श्लोकापर्यंत भगवंत आपल्या विभूतींचे वर्णन पुन्हा एकदा संक्षेपाने करीत आहेत. भक्ताने भगवंताशी कसे व कोठे जोडायचे याचे हे वर्णन आहे. ईश्वरीय विभूतिमत्त्वाशी अविभक्त असणे हीच भक्ती!

**यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् ।**
**यच्चन्द्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ।।१२।।**
**गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा ।**
**पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः ।।१३।।**
**अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः ।**
**प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम् ।।१४।।**
**सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्टो मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ।**
**वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदान्तकृद्वेदविदेव चाहम् ।।१५।।**

"सूर्याच्या ठिकाणी असणारे जे तेज सर्व जगाला प्रकाशित करते, तसेच जे तेज चंद्राच्या ठिकाणी आहे आणि जे अग्नीमध्ये आहे, ते माझेच तेज आहे असे समजा." ।।१२।।

"मीच पृथ्वीत प्रवेश करून आपल्या शक्तीने सर्व भूतांना धारण करतो आणि अमृतमय, रसात्मक चंद्र होऊन सर्व वनस्पतींचे पोषण करतो." ।।१३।।

"मीच वैश्वानररूप अग्नी होऊन प्राण्यांच्या शरीरात राहतो आणि प्राण व अपान यांनी युक्त होऊन प्राण्यांनी खाल्लेले चार प्रकारचे अन्न पचवितो. (भक्ष्य = चावून खाण्याचे पदार्थ; भोज्य = पिण्याचे पदार्थ; चोष्य = चोखण्याचे पदार्थ; लेह्य = चाटण्याचे पदार्थ; या चार प्रकारच्या पदार्थांना चतुर्विध अन्न असे म्हटले आहे.) ।।१४।।

"मीच सर्वांच्या अंतःकरणात असतो. माझ्यामुळेच स्मृती, ज्ञान आणि अपोहन (संशय इ. दोषांचा नाश) होतात. सर्व वेदांच्या द्वारे जाणण्यास

योग्य मीच. वेदान्ताचा कर्ताही मीच आणि वेद जाणणाराही मीच." ।।१५।।

भगवंतांनी वरील चार श्लोकांत आपल्या विभूती पुन्हा एकदा सांगितल्या आहेत. यापूर्वी दहाव्या अध्यायात (विभूतियोगात), जड, चेतन या सर्वांमध्ये असलेल्या आपल्या विभूती सांगितल्या. "कोणत्या भावात तुझे चिंतन करू, चित्त एकाग्र करू?" या अर्जुनाच्या प्रश्नावर भगवंतांनी त्या सविस्तर सांगितल्या. भगवंताचे ऐश्वर्य व कौशल्य (विभूती) यांना जो समजतो, तो अविचल ईश्वरनिष्ठ बनतो. भगवान ह्या संपूर्ण सृष्टीचा कर्ता आहे ही गोष्ट मनात पक्की दृढ झाली की, अविकंप विश्वास निर्माण होतो. हा विभूतियोग यथार्थतेने समजला तरच सृष्टीशी तादात्म्य होऊन पूज्यभाव निर्माण होतो. अशी पूज्यबुद्धी आली की, सृष्टीत भगवंताचे दर्शन सर्वत्र व्हायला लागते. सृष्टीतील सारे पदार्थ भगवंतमय दिसायला लागतात. संपूर्ण जगच त्यांची विभूती असल्याने, भगवंताची पूजा केवळ मूर्तीत न होता ती व्यापक झाली पाहिजे हा गीतेचा संदेश आहे. सृष्टी हे भगवंताचे जिवंत पुस्तक आहे. निसर्ग हा माणसाचा खरा गुरू आहे. म्हणूनच भारतीय तत्त्वज्ञानांत वृक्षपूजा, आत्मीयतेने व प्रसन्नतेने केली जाते. जगाकडे, निसर्गाकडे केवळ भोगवादी व उपयुक्ततेच्या दृष्टीने न पाहता त्यात ईश्वराचा वास आहे, म्हणून कृतज्ञता, आत्मीयता व पूज्यभाव आला पाहिजे. भक्ताला संपूर्ण सृष्टीतील सर्वच पदार्थ पूजेची साधने वाटली पाहिजेत. सर्व कर्मे पूजाद्रव्ये करायची अशी दृष्टी झाली पाहिजे. ही या पंधराव्या अध्यायातील महान शिकवण आहे. त्यासाठीच पुन्हा एकदा भगवंतांनी वरील चार श्लोकांतील आपल्या विभूती सांगितल्या. गीतेची ही व्यापक दृष्टी, श्री ज्ञानदेवांनी अमृतानुभवात एका सुंदर दृष्टांताने समजावून दिली आहे.

**देव देऊळ परिवारु । कीजे कोरून डोंगरू,**
**तैसा भक्तीचा वेव्हारु । कां न होआवा ।।**

एकाच डोंगराच्या विशाल दगडामध्ये कोरून तेथे दगडाचेच मंदिर, त्या मंदिरात दगडाचीच पूजाद्रव्ये, दगडाचाच देव, दगडाचाच एक भक्त... एकच अखंड दगड व त्याची अनेक रूपे असे होऊ शकते... तर मग भक्तीच्या व्यवहारातही का होऊ नये? गीताप्रणीत भक्तीचा हा मंत्र आहे. जगातल्या साऱ्या वस्तूत तो भगवंत भरून उरलेला असल्याने इथे भेदाभेद मुळी नाहीच.

हाच मंत्र तुकारामांनी सांगितला -

**विष्णुमय जग, वैष्णवांचा धर्म ।**
**भेदाभेद भ्रम अमंगळ ।**



ज्याच्या ठिकाणी हे अभेद ज्ञान आले त्याच्या ठिकाणी भगवंताविषयीचे प्रेम उत्कटतेने आलेच. कारण ज्ञान होणे व प्रेम होणे या दोन भिन्न क्रिया जणू नाहीतच. जसे समुद्रातील एक थेंब किंवा लहर म्हणजे समुद्रच, किंवा एक परमाणू म्हणजे पृथ्वीच, तसे जीवही शिवाचाच अंश म्हणून भक्तीची व्याख्या श्री ज्ञानेश्वरांनी साररूपाने अशी केली -

**ऐसेनि या समरसें । दृष्टि जें उल्हासे ।**
**ते भक्ति पैं ऐसें । आम्ही म्हणो ।।** (३८७-अ.१४)

"अशा ऐक्याने अभेदज्ञानाने जेव्हा दृष्टी विकसित होते तेव्हा त्याला आम्ही 'भक्ती' असे म्हणतो."

हीच दृष्टी म्हणजे ज्ञानाचे व योगाचे सार होय. सर्व उपनिषदांचे सारसुद्धा हेच आहे. एक प्रातिनिधिक श्लोक असा -

**एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा ।**
**कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः साक्षी चेता केवलो निर्गुणश्च ।**
(श्वेताश्वतर उप. अ. ६.११)

"एकच देव सर्वभूतमात्रात आहे; सर्वव्यापक असा तो सर्वांच्या अंतःकरणात वास करतो आहे; चैतन्यरूपाने सृष्टीतील साऱ्या पदार्थांत तो भरून आहे... तोच साऱ्या व्यवहारांना कारण आहे."... जीवनात सर्वत्र ही दृष्टी आली की सृष्टी भगवंतमय दिसायला लागते. सर्वत्र एकच चैतन्य खेळून राहिले आहे ही दृढभावना झाली की, प्रत्येक कर्म ज्ञानमय, भक्तिमय होऊन दैवी बनते. सारे जीवनच हरिमय व्हावे, पूजारूप व्हावे ही या अध्यायाची शिकवण आहे. म्हणून भगवंत म्हणतात की, "सूर्य-चंद्राचे तेज व अग्नीचे तेज हे माझेच तेज आहे; सर्व वनस्पतींचे, सृष्टीचे पोषण मीच करतो; सर्वांच्या अन्नाचे पचन माझ्या वैश्वानररूप अग्नीमुळे होते; सर्वांच्या हृदयात मी अधिष्ठित असून माझ्यामुळेच स्मृती, ज्ञान व अपोहन (संशय इ. दोषांचा नाश) होतात. वेदांचा कर्ताही मीच व वेद जाणणाराही मीच."

१५ वा श्लोक संपूर्ण गीतेतील एक मांगलिक श्लोक आहे. भगवंतांनी या श्लोकात आपला पत्ता सांगितला आहे. आधी विभूती सांगून झाल्या व आता आपले अस्तित्व कोठे आहे ते स्वतःच सांगत आहेत. सर्वांच्या हृदयातील प्राणशक्ती मी आहे. विवेकबुद्धी किंवा ज्ञान अथवा मन, स्मृती व अपोहन मी आहे. श्री ज्ञानेश्वरांनी या श्लोकावर भाष्य करताना म्हटले आहे -

**एऱ्हवी सर्वांचा हृदयदेशी । मी अमुका आहे ऐसी ।**
**जे बुद्धि स्फुरे अहर्निशीं । ते वस्तु गा मी ।।४२१।।**

**परी संतासवे वसता । योगज्ञानी पैसतां ।**
**गुरुचरण उपासिता । वैराग्येसी ।।४२२।।**
**येणेचि सत्कर्मे । अशेषही अज्ञान विरमे ।**
**जयांचे अहं विश्रामे । आत्मरुपी ।।४२३।।**
**ते आपोआप देखोनि देखी । मिया आत्मेनि सदा सुखी ।**
**येथे मी वाचून अवलोकी । आन हेतु असे ।।४२४।।**

"अर्जुना, वास्तविक विचार करून पाहिले तर सर्वांच्या हृदयदेशात, मी अमका आहे, अशी जी बुद्धी रात्रंदिवस स्फुरते, ती वस्तू मी आहे." ।।४२१।।

"परंतु संतांच्या संगतीत राहिले असता आणि योग व ज्ञान यात प्रवेश केला असता (याचा अभ्यास केला असता) आणि वैराग्याने युक्त होऊन गुरुचरणांची सेवा केली असता." ।।४२२।।

"याच सत्कर्माच्या योगाने संपूर्ण अज्ञान नाहीसे होते व ज्यांचा अहंकार आत्मस्वरूपी स्थिर होतो." ।।४२३।।

"ते पुरुष आपले स्वरूप आपण ज्ञानाने जाणून त्यांचा आत्मा मी असल्याने माझ्या सुस्वरूपत्वाने नेहमी आनंदात असतात. या ठिकाणी होणाऱ्या आत्मदर्शनास माझ्याशिवाय दुसरे कोणी कारण आहे काय?" ।।४२४।।

वारकरी संप्रदायात परमात्म्याला 'वस्तू' या नावाने संबोधले जाते. या मृण्मय शरीरात तोच चिन्मय असल्याने या शरीराला किंमत आहे. नाहीतर हे पंचमहाभूताचे म्हणजे मातीचेच खेळणे! जोपर्यंत अंतःकरणात काम, क्रोध, अहंकार हे विकार आहेत तोपर्यंत भगवंताच्या अस्तित्वाच्या खुणा कळत नाहीत. "काम क्रोध आड । पडले पर्वत । राहिला अनंत पलिकडे।।" या तुकारामांच्या उक्तीत हे सार दडले आहे. संतांच्या संगतीत व योग, ज्ञानाच्या अभ्यासाने, वैराग्याने जेव्हा अंतःकरणशुद्धी होते तेव्हा अहंकाराचा, अज्ञानाचा लोप होतो. त्यामुळे अशा निरहंकारी, शुद्ध अंतःकरणात आत्मदर्शन घडते. भगवंत जसा आनंदस्वरूप आहे तसेच आपणही सुखरूपच आहोत. आत्मा हा त्याचाच अंश असल्याने अशा शुद्ध अंतःकरणात तोच आनंद भरून राहतो. सहाव्या अध्यायातसुद्धा हाच विचार ज्ञानेश्वरांनी मांडला आहे-

**हा विचारुनि अहंकार सांडिजे । मग असतीच 'वस्तु' होईजे ।**
**तरी आपली स्वस्ति सहजे । आपण केली ।।** (७१-अ.६)

"विचार करून हा अहंकार टाकावा आणि मग तेथेच असलेले आपले स्वरूप ओळखून ब्रह्मरूप व्हावे, म्हणजे आपले कल्याण आपणच केल्यासारखे सहज होईल."



मुळात तो अंश, ती वस्तू आहे तेथेच आहे. सर्वांच्या हृदयस्थानी तो विराजमान आहे. पण त्याचा अनुभव मात्र साधनेशिवाय होत नाही. जन्म-जन्मांतरीचे वासनेचे मळ आणि कातडीसारखा चिकटलेला अहंकार जोपर्यंत मिटत नाही तोपर्यंत हे आत्मदर्शन दुर्लभ आहे. जसा अर्जुनाच्या हृदयात तो होता तसाच दुर्योधनाच्याही हृदयात तो होता. अर्जुनाला त्याचे दिव्य दर्शन झाले पण दुर्योधनाला भगवंताच्या संगतीतसुद्धा त्याची प्रचिती आली नाही. म्हणून ज्याचा देहाभिमान, अहंकार व तमोगुण अस्तित्वात आहे त्याला ही अनुभूती कदापि प्राप्त होत नाही. प्रत्यक्ष भगवंत जरी समोर प्रकट झाला तरी त्याला भगवंताचे दर्शन होणे दुरापास्त असते. तसे दुर्योधनाचे झाले.

"प्रत्येक जीवामध्ये ईश्वररूपात मी राहिलो आहे. मीच या सर्वांना यंत्राप्रमाणे चालवितो," हे पुन्हा भगवंतांनी अठराव्या अध्यायात सांगितले आहेच. गीतेत पुनःपुन्हा भगवंतांनी याची आठवण मनुष्यास करून दिली आहे. या १५ व्या श्लोकात याचे निःसंदिग्ध निवेदन आहे. त्यामुळे या श्लोकातील भाव अधिक दृढ झाला आहे. मनुष्याने मनुष्याकडे कसे पाहावे याचा हा वस्तुपाठ आहे. एकदा एक वारकरी आपल्या जवळच्या नातेवाईकाला पाहण्यासाठी मोठ्या शहरात गेला होता. त्या नातेवाईकाला मोठ्या हॉस्पिटलात ठेवले होते. हृदयाचे गुंतागुंतीचे ऑपरेशन यशस्वीरीत्या पार पडले होते, म्हणून डॉक्टरांचे आभार मानण्यासाठी हा वारकरी त्यांच्याकडे गेला. त्या डॉक्टरांना अंतःकरणपूर्वक धन्यवाद देऊन त्याने डॉक्टरांचे पाय धरले व नमस्कार केला. डॉक्टरने मला का नमस्कार करता म्हणून त्याला विचारले. तेव्हा वारकरी म्हणाले, "मी तुम्हाला नमस्कार करीत नाही. तुमच्या अंतःकरणातल्या त्या भगवंताला मी नमस्कार करतोय ज्याने तुम्हाला ही बुद्धी व कौशल्य दिले." डॉक्टर या उत्तराने थोडे अंतर्मुख झाले. माझ्यात राम, तुझ्यात राम, सर्वांभूती राम ही वेदांताची शिकवण आहे. गीता हे उपनिषदांचे सार आहे. माझे शरीर कोण चालवितो? अन्नाचे पचन कोण करतो? रक्त कोण बनवितो?... अशा प्रश्नांनी अंतःकरणात डोकावून पाहण्याचा प्रयत्न केला की, भगवंताच्या निदान अस्तित्वाची जाणीव व्हायला लागते. एकच चित्‌शक्ती सर्वांच्या ठायी आहे अशी श्रद्धा, मनुष्यात निर्माण झाली की, विश्वात्मक देवाची व विश्वबंधुत्वाची मूल्ये सहजतेने दृढ व्हायला लागतात. 'सर्वस्य चाहं...' म्हणजे सर्वांत भगवान आहे. या श्लोकातील हा शब्द महत्त्वाचा आहे. जसा सर्वांच्यात आहे तसा तो माझ्यातही आहे. हृदि म्हणजे बुद्धी. बुद्धीत कामना, वासना, अहंता, ममता सर्व काही आहे. जोपर्यंत बुद्धी मलिन आहे तोपर्यंत तिथेच असलेला भगवंत दूर आहे व जेव्हा

बुद्धी शुद्ध होते तेव्हा तो जवळ असतो. बुद्धीमधील संकल्प जेव्हा भगवंताचे होतात, तेव्हा समर्पित भावनेने आपण व्यवहार करू लागतो. जे जे कर्म आपल्या हातून होते ते ते सर्व भगवंताला अर्पण करायचे व कर्मबंधनातून सुटायचे. हीच कर्मे शेवटी भगवंताची कर्मे म्हणूनच करायची. अशा समर्पणाने मनुष्याचा अहंकार नाहीसा होतो. 'मी', 'माझे'च्या ठिकाणी 'तूं', 'तुझे' आले की, ही बुद्धी शुद्ध व्हायला लागते. हे ज्ञान व भक्ती जेवढी प्रभावी होतात तेवढा भगवान बुद्धीत व्यक्त होत असल्यामुळे त्यांनी सहजपणाने बोललेले शब्दसुद्धा मंत्र होतात. संतांचे सहज बोलणे हा हितोपदेशच असतो. संताप्रमाणे प्रत्येक मनुष्याच्या बुद्धीत भगवंत बसला आहे हे आश्वासन या श्लोकांतून भगवंतांनी दिले आहे. म्हणून संत जसे वागले तसे वागण्याचा मनुष्याने प्रयत्न केला तर हा दिव्यानुभव त्यांनाही येऊ शकतो. संतांनी 'मी केले' असे कधीच म्हटले नाही. भगवंतांनी आपल्यास निमित्त केले असाच भाव संतांचा असतो. अध्यात्मात, भक्तीत 'मी', 'अहं' राखणे हे सर्वांत मोठे पाप आहे. सर्व काही भगवंतच करतो व करवितो हा भाव जेव्हा दृढ व्हायला लागतो तेव्हा हा अहंकार मिटायला लागतो.

ऐतरेय ब्राह्मणात या अहंकारासंबंधी गोष्ट आहे. एका ब्राह्मणाच्या दारात एक गाय येऊन उभी राहिली. ते पाहून दुरूनच त्याने एक लाकूड तिच्या अंगावर फेकले. त्याचा प्रहार मर्मस्थानी लागल्यामुळे ती गाय गतप्राण झाली. गोहत्येचे पाप झाल्यामुळे यमदूत त्या ब्राह्मणाला न्यावयास आले तेव्हा तो म्हणाला, ''मला न्यायला विष्णुदूत आले पाहिजेत.'' तेव्हा यमदूतांनी सांगितले, ''गोहत्या हातून घडल्यामुळे आम्ही न्यावयास आलो आहोत.'' ब्राह्मण म्हणाला, ''मी गाय मारलेली नाही. माझ्या हातांनी गाय मारली आहे. शिवाय या हातांची देवता इंद्र आहे. तेव्हा या घटनेला इंद्र जबाबदार आहे, मी नाही.'' इंद्राने हे सर्व यमदूताकडून ऐकून घेतले. ब्राह्मणाला योग्य ती शिक्षा देण्यासाठी, इंद्राने ब्राह्मणाचे रूप घेऊन त्याच्या घरी आगमन केले. इंद्राने ब्राह्मणाच्या वैभवाची मुक्तकंठाने प्रशंसा केली. या स्तुतीने दोघेही पती-पत्नी संतुष्ट झाले व त्यांनी इंद्राला भोजन करावयाची विनंती केली. भोजनानंतर ब्राह्मणाने इंद्राला आपली वाडी दाखविली. इंद्राने स्तुती करत त्याला विचारले, ''हे सर्व कोणी बनविले?'' तत्काळ ब्राह्मणाने उत्तर दिले, ''मी जेव्हा राहायला आलो तेव्हा हे उजाड मैदान होते. मी मेहनत केली व माझ्या हातांनी ही सुंदर वाडी बनविली.'' इंद्राने तत्काळ यमदूतांना बोलाविले व म्हणाले, ''ह्या खोटारड्या माणसाला पकडा. जर तुझ्या हातांनी गाईची हत्या मी केली, तर मग ही हिरवीगार वाडी तू केलीस, असे कसे म्हणता येईल? ही वाडीसुद्धा इंद्राने केली असा का म्हणाला नाहीस?''



या गोष्टीचे तात्पर्य एवढेच की, मनुष्याच्या मनातून कर्तृत्वभाव केव्हाही जात नाही. चांगले घडले की, मी केले व प्रमाद घडला की, मी जबाबदार नाही असा सूर नेहमीचा असतो. प्रपंचात 'मी केले'चा घोष सतत सुरू असतो. हाच 'मी' भगवंताला अर्पण करायचा. मी भगवंताचा आहे, भगवंत माझे जीवन चालवितो. त्याच्याच शक्तीने माझ्या हातून हे सर्व घडते आहे असा समर्पित भाव निर्माण झाला की, बुद्धी शुद्ध होते. ''माझ्या हृदयात भगवंत बसला आहे.'' ही जाणीव झाल्यानंतर अशा भक्तीला सुरुवात होते. 'तेनं त्वं असि', 'तस्य त्वं असि' व शेवटी 'तत् त्वं असि' हे भक्तीचे सोपान आहेत. मनुष्याचा विकास यामध्ये आहे. ''मी त्याच्यामुळे आहे,'' ''मी त्याचा आहे'' व शेवटी ''मी तोच आहे.'' ही भावना जेवढी दृढ होईल तेवढे आपण भगवंताजवळ पोहोचतो. भगवंत माणसाच्या हृदयात आहे या श्रद्धेने का होईना, पण माणसाने सत्प्रवृत्त बनले पाहिजे. भगवंताचा एक तरी गुण जीवनात आणण्याचा प्रयत्न केला पाहिजे. भगवंताला आवडणाऱ्या गोष्टी जीवनात आणल्या पाहिजेत. भगवंत जसा आहे तसे होण्याचा प्रयत्न करणे यात जीवनाची कृतार्थता आहे. मनुष्याच्या जीवनाचे ते अंतिम ध्येय आहे.

''मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च.'' भगवान सांगतात : स्मृती माझ्याकडून मिळते. आपल्याला रोजच्या जीवनात, सर्व क्षेत्रांत जी स्मृती राहते ती भगवंताची कृपा आहे. म्हणून या कृपेचा सदुपयोग व्हायला पाहिजे. आत्मस्मृती व प्रभुस्मृती या दोन्ही स्मृती सतत राहिल्या पाहिजेत. हृदयात 'सोऽहं'चे सतत भान असले पाहिजे. 'तोच मी आहे', 'त्याचा मी आहे' या सततच्या स्मरणातून भगवंत व आपला संबंध दृढ होतो. वेदांतात एक गोष्ट आहे. एक सिंहाचा छावा आईबापापासून वेगळा पडला आणि तो बकऱ्यांच्या कळपात लहानाचा मोठा झाला. सिंहाचा छावा पण स्वतःला बकराच समजू लागला.

एक दिवस तो सिंहाचा छावा बकऱ्यांच्या कळपाबरोबर जंगलात फिरत होता. तेवढ्यात तेथे एक सिंह आला आणि त्याने गर्जना केली. सिंहाची गर्जना ऐकताच बकऱ्यांचा कळप पळू लागला. त्यांच्यासोबत तो सिंहाचा छावाही घाबरून पळू लागला. सिंहाच्या छाव्याला असे पळताना पाहून सिंहाला वाईट वाटले. तो उडी मारून पुढे झाला आणि त्याने सिंहाच्या छाव्याला पकडले. त्याला सांगितले, ''माझी गर्जना ऐक. ती ऐकून बकरी पळतात हे समजू शकतो. परंतु तू तर सिंहाचा छावा आहेस! तू का पळतोस?'' सिंहाचा छावा सांगतो, ''नाही, नाही! मी सिंह नाही. मीही त्यांच्यासारखाच आहे. लहान असल्यापासून मी त्यांच्यात वाढलो आहे.'' सिंह सांगतो, ''तू बकरा नाहीस. तू सिंह आहेस. चल मी तुला दाखवितो.''

असे सांगून सिंह त्याला विहिरीजवळ घेऊन जातो. विहिरीच्या पाण्यात स्वतःचे व त्या छाव्याचे रूप दाखवितो. मग विचारतो, ''बघ, तू माझ्यासारखा आहेस की नाही? हां आता मी गर्जना करतो तशी तूही गर्जना कर.'' सिंहाच्या छाव्याने गर्जना केली. त्याला आपल्या मूळ स्वरूपाचे दर्शन झाले. सिंहाने छाव्याला त्याच्या आत्मप्रचितीची जाण करून दिली.

ऋषींनी वेद-उपनिषदांतून आपल्याला आपल्या दिव्यशक्तीची जाणीव करून दिली आहे. त्यांचा घोष आहे, ''उत्तिष्ठत, जाग्रत प्राप्य वरान् निबोधत.'' तमोरूपी अंधकारातून जागे व्हा. ज्ञानी गुरूंकडे जाऊन आत्मबोध करून घ्या. तुम्ही अमृताचे पुत्र आहात. तोच अंश तुमच्यात आहे. दुर्बल, निराश न होता आतल्या प्रचंड ऊर्जेला जागे करा. भगवंत जसा 'सत्यं शिवं सुंदरम्' आहे तसेच तुमचे रूप आहे. म्हणून 'सोऽहं'ची स्मृती सतत राहू द्या.

दुर्दैवाने, ज्यांच्याकडे ही स्मृती नसते ते वासुदेवाऐवजी वासनेला पकडतात. काम-क्रोध-लोभ अशा विकारांच्या अधीन होऊन दीन, लाचार बकऱ्याचे जीवन जगतात. क्रोधाने मनुष्य अविवेकी बनतो. लोभी-लाचार बनवितो. काम-दीन बनवितो, म्हणून माणसाला 'सोऽहं'चे सतत स्मरण असले पाहिजे. व्यवहारातसुद्धा हीच स्मृती साहाय्य करते म्हणून भगवंतांनी दिलेल्या स्मृतिशक्तीला दैवी बनविले पाहिजे. दैवी विचारांची, संत-महात्म्यांच्या वचनांची सतत स्मृती ठेवून प्रभु-स्मरण व आत्मस्मरण करीत राहिले पाहिजे.

नंतर भगवंत सांगतात की, जशी स्मृती-विस्मृती माझ्याकडून मिळते तसे ज्ञानही माझ्याकडून मिळते. पदार्थाची जाण, वस्तू, मनुष्य, जग व जगदीशाची जाण हीसुद्धा भगवंताच्या कृपेने प्राप्त होते. भौतिक सृष्टीचे ज्ञान व ब्रह्मांडाचे ज्ञानदेखील त्यांच्याकडूनच मिळते. आपल्या देशात श्री ज्ञानेश्वर, विवेकानंद, शंकराचार्य असे ज्ञानी झाले. श्री ज्ञानेश्वरांनी केवळ सोळाव्या वर्षी ज्ञानेश्वरी लिहिली. बंगालचे ज्ञानेश्वर असणारे विवेकानंद, ऐन तरुण वयात वेद-उपनिषदे, भारतीय संस्कृतीच्या महान ग्रंथांचे ज्ञान मिळवून जगाला देण्यासाठी सर्वत्र संचारले. केवळ ३१ वर्षांच्या अल्प आयुष्यामध्ये, प्रचंड ज्ञान मिळवून, भारतीय संस्कृतीचे उत्थान श्री शंकराचार्यांनी केले. आध्यात्मिक ज्ञान भगवंतापासून मिळते. ते प्रभुकृपेशिवाय मिळत नाही. पण भौतिकज्ञानसुद्धा प्रभुकृपेशिवाय मिळत नाही. यात मानवी पुरुषार्थ नाही असे नाही. पण या मानवी पुरुषार्थाला ईश्वरकृपेची साथ लाभते तेव्हा अद्भुत चमत्कार घडतात. अनाकलनीय, गूढ असे सत्य शोधून काढले जाते. जे होते पण प्रगट नव्हते, ते दृष्टोत्पत्तीला आले म्हणून तो नव्याने शोध! सृष्टीतील अशी असंख्य प्रमेये अद्याप उलगडायची आहेत.



ज्या ज्या वैज्ञानिकांनी असे शोध लावले त्यांचे जीवन अभ्यासिले म्हणजे याची प्रचिती येते. जेम्स वॅटने बाष्पशक्ती शोधून काढली. त्या वेळी तो वयाने खूप लहान होता. चुलीवरच्या चहाच्या किटलीतील वाफ बाहेर येत होती व किटलीचे झाकण हालत होते. हीच गोष्ट त्यापूर्वी हजारो जणांनी पाहिली होती पण जेम्स वॅटला जे आकलन झाले तसे त्यापूर्वी कोणाला झाले नव्हते. गॅलिलिओ बारा-तेरा वर्षांचा होता. तो आजोबा-आजीसोबत चर्चमध्ये गेला होता. जोरदार वाऱ्याने चर्चमध्ये टांगलेले दिवे झोके दिल्यासारखे इकडून तिकडे हालत होते. दिवे हालताना पाहून त्याने स्वतःच्या नाडीवर हात ठेवला. दिव्याच्या गतीसोबत त्याने नाडीचे ठोके मोजले. एवढ्या सामान्य घटनेतून गॅलिलिओने गतिशास्त्र शोधून काढले. गॅलिलिओ फारसा शिकलेलाही नव्हता. त्याला कोणी मार्गदर्शकही नव्हता आणि तशी लॅबोरेटरीही नव्हती. न्यूटनने गुरुत्वाकर्षणाचा शोध लावला तोही अशाच सामान्य घटनेवरून. केवळ चौदा वर्षांचे वय! शेतकऱ्याचा मुलगा. झाडावरून फळ पडताना पाहिले. त्याने विचार केला की, हे फळ खालीच का पडले? अशी घटना सर्वांनीच पाहिली होती, पण न्यूटनने मात्र त्यावरून गुरुत्वाकर्षणाचा शोध लावला. अठरा वर्षांच्या मार्कोनीने वायरलेसचा शोध लावला. हे सर्व वैज्ञानिक ऋषी म्हणजे तिथले ज्ञानेश्वरच! भगवंताची कृपा झाली की, असे अद्‌भुत ज्ञान प्रसवते. केवळ मानवी बुद्धीला हे अशक्य आहे, अतर्क्य आहे. जसे हे भौतिक ज्ञान तसेच आत्मज्ञान. स्वस्वरूपाचे, भगवंताचे, भगवंताच्या ब्रह्मांडाचे ज्ञान अध्यात्मात मोडते. केवळ साधनेने हे मिळते असे नाही. भगवद्‌शक्तीच्या कृपेने हा आत्मलाभ, हे आत्मज्ञान प्राप्त होते. ज्याची जीवनश्रेणी उन्नत होते तो या कृपेसाठी पात्र होतो. ह्या आत्मज्ञानाची अनुभूती प्राप्त करायची त्याची इच्छा, केवळ भगवद्‌कृपेने फलद्रूप होते. पण असे जे पात्र नसतात त्यांच्या ठिकाणी असलेले 'अपोहनं' म्हणजे विस्मृती, अज्ञानही भगवंताकडून मिळते.

सद्रूपता आणि आनंदरूपता ही भगवंताची रूपे आहेत. भोगानंद, भावानंद व आत्मानंद या पायऱ्या आहेत. अध्यात्मात भाव अत्यावश्यक आहे. चित्त द्रुत होताच मनावर भगवंताची मोहर बसते. म्हणून मधुसूदन सरस्वतींनी भक्तीची व्याख्या करताना 'द्रुते चित्ते प्रविष्टायाः गोविंदाकरता स्थिरा सा भक्ति'' म्हटले आहे. चित्त द्रवले की, भगवंताची मूर्ती स्थिर होते. असा हा भावानंद अनुभवण्याची, समजण्याची, शक्ती ओळखण्याची जाण वैदिक वाङ्मयापासून मिळते. म्हणून या श्लोकात 'वेदैश्च सर्वैः' असे म्हटले आहे. वेद हे अपौरुषेय असून ते भगवंताचे श्वास आहेत. या वेदांच्या ज्ञानाने

भगवंतासाठी हृदय भरून येते. सर्व वेदाद्वारे जाणण्यास योग्य मीच आहे. वेदांत तत्त्वज्ञानाचा कर्ता व वेदांना जाणणाराही मीच आहे असे भगवंत म्हणतात.

१५ व्या श्लोकातून भगवंतांनी आपला निश्चित ठावठिकाणा सांगितला आहे. मनुष्याच्या मनातील संदेह दूर केला आहे. भगवंताचे सर्वव्यापकत्व येथे प्रकट झाले आहे. सर्वव्यापक चैतन्य तत्त्वाचा अनुभव आल्यानंतर, मनुष्याला आत्मौपम्य दृष्टीने जगाकडे पाहायची बुद्धी होते. तसेच स्वतःतील 'मी' व्यापक झाल्याने चैतन्य सर्वव्यापक आहे याची खूण पटते. सर्वांच्या हृदयात तो भगवंत आहे. 'वासुदेवः सर्वमिति' हा ज्ञानी मनुष्याचा भाव आहे. भगवंत व आपले नाते सांगणारा हा श्लोक असल्याने याचे महत्त्व अपरंपार आहे.

अशी अद्वैत दृष्टी आली की, 'मी-माझे'पण हा अहंभाव निघून जातो. अशा 'सोऽहं' भावाने सृष्टीशी एकरूप होऊन जेव्हा भक्ती होते तेव्हा संपूर्ण जीवनच प्रभूचा प्रसाद बनते. सर्वच हरिमय झाल्यामुळे मी भक्त, तो परमात्मा सेव्य व साधनरूप सृष्टी हा भेदाभेदही नाहीसा होऊन सर्वच प्रभुमय होऊन जाते.

अशा प्रकारे आपल्या विभूती सांगून आता भगवंत या सृष्टीचे संपूर्ण रहस्य तीन पुरुषांच्या रूपात सुस्पष्ट प्रकारे समजावून सांगत आहे.

**द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ।**
**क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ।।१६।।**
**उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ।**
**यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ।।१७।।**
**यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः ।**
**अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ।।१८।।**
**यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम् ।**
**स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ।।१९।।**
**इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ ।**
**एतद्बुद्ध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत ।।२०।।**

"या विश्वात क्षर आणि अक्षर असे दोन प्रकारचे पुरुष आहेत. त्यापैकी सतत बदलत असलेले सर्व जग हा क्षर म्हणजे नश्वर पुरुष होय. आणि त्यातील जीवात्मा हा अक्षर म्हणजे अविनाशी पुरुष होय." ।।१६।।

"या दोहोंहून निराळा उत्तम पुरुष आहे. तो तिन्ही लोकांना व्यापून सर्वांचे धारण-पोषण करतो. हा अविनाशी परमेश्वर 'परमात्मा' म्हटला जातो." ।।१७।।

"मी नाशवंत जड जगताच्या फार पलीकडचा आहे आणि अविनाशी जीवात्म्याहूनही उत्तम आहे. म्हणून लोकांत आणि वेदांतही मी 'पुरुषोत्तम' नावाने प्रसिद्ध आहे." ।।१८।।



"हे भारता! याप्रमाणे जो ज्ञानी पुरुष मला 'पुरुषोत्तम' म्हणून अनुभवाने जाणतो, तोच सर्वज्ञ होय. तो मला सर्व प्रकारे भजतो." ।।१९।।

"हे निष्पाप अर्जुना! हे सर्वांत अत्यंत गुप्त असे शास्त्र मी तुला सांगितले. हे जाणून घेतल्याने मनुष्य ज्ञानी व कृतकृत्य होईल." ।।२०।।

१५ व्या श्लोकापर्यंत भगवंतांनी संसार, जीवात्मा व परमात्मा यांचे विस्तृत वर्णन केले. आता १६ व १७ या दोन श्लोकांत, याचेच वर्णन क्षर, अक्षर आणि पुरुषोत्तम या नावांनी भगवंत स्पष्ट करीत आहेत. शरीरादी जड व नाशवंत पदार्थांना 'क्षर' असे म्हटले आहे. याच जड पदार्थांत जे अविनाशी तत्त्व आहे, ज्याच्यामुळे प्राण आपले कार्य करतो तो जीवात्मा 'अक्षर' पुरुष या नावाने संबोधिला आहे. हा अक्षर पुरुष शाश्वत, अव्यय व अखंड आहे. तो परमात्म्याचा अंश असल्याने स्वरूपतः अंशीचे गुण धारण करणारा आहे. या कालातीत, स्थलातीत अक्षर पुरुषाला केवळ अंतर्मुख होऊन जाणता येते. बदलणाऱ्या क्षर पुरुषात (म्हणजे 'क्षेत्रा'त) न बदलणारा अक्षर पुरुष 'क्षेत्रज्ञ' म्हणून राहतो. क्षर पुरुष दृष्टोत्पत्तीस येतो, पण अक्षर पुरुष अकर्ता, शांत राहून प्रकृतीचा व्यवहार पाहत असतो. स्वरूपतः जीवात्मा सदा सर्वदा निर्विकार आहे; पण मोह व अज्ञान या प्रकृतीच्या गुणांना आपले मानून तो 'जीव' बनला आहे.

१७ व्या श्लोकात या दोन पुरुषांहून श्रेष्ठ असणाऱ्या उत्तम पुरुषाचे वर्णन भगवंत करीत आहेत. या उत्तम पुरुषालाच 'परमात्मा' असे म्हणतात. परम म्हणजे श्रेष्ठ! श्रेष्ठ आत्मा किंवा सर्व जीवात्म्यांचा आत्मा! हा परमात्मा तिन्ही लोकांत व्याप्त आहे. तोच सर्वांचे भरण-पोषण करणारा आणि नित्य व अव्यय असा आहे.

१८ व्या श्लोकात, सर्वांत गुह्य गोष्ट भगवंतांनी सांगितली आहे. प्रतिक्षण बदलणाऱ्या क्षर पुरुषापेक्षा मी नित्यनिरंतर निर्विकार असल्यामुळे सर्वथा अतीत असा आहे. परमात्म्याचा अंश असूनसुद्धा 'जीवात्मा' प्रकृतीच्या गुणांनी मोहित होतो, पण परमात्मा सतत गुणातीत आणि निर्लिप्त राहतो. म्हणून जीवात्म्याहूनही तो श्रेष्ठ आहे. यामुळेच सर्व शास्त्रांत, वेदांत भगवंताला 'पुरुषोत्तम' नावाने वर्णिले आहे.

जो भक्त याप्रमाणे मला 'पुरुषोत्तम' म्हणून जाणतो, ज्याच्या मनात याविषयी कोणताही विकल्प, भ्रम अथवा संशय नसतो, तो 'सर्वविद्' म्हणजे सर्वज्ञ आहे. असे भगवंत १९ व्या श्लोकात सांगतात. चौदाव्या अध्यायात, शेवटच्या श्लोकात सांगितलेली 'अव्यभिचारिणी' भक्ती ती हीच. मी केवळ

भगवंताचा आहे व जे जे काही या विश्वात आहे त्यात भगवंताशिवाय अन्य काही नाही अशी समर्पित भावना झाली की, हातून घडणारे प्रत्येक कर्म दैवी बनते व संपूर्ण जीवनच प्रभुप्रसाद बनते. भगवंताला सर्वोपरी मानल्यानंतर, संसाराविषयी अनासक्त होऊन सर्व कार्यांत भगवंताचेच भजन होते. गीतेतील सर्वश्रेष्ठ आध्यात्मिक अनुभूती म्हणजे या पुरुषोत्तमतत्त्वाचीच अनुभूती होय. वास्तविक क्षर, अक्षर व पुरुषोत्तम हे अभेद आहेत. क्षर पुरुष म्हणजे क्षेत्र किंवा प्रकृती ही पुरुषोत्तमाची माया आहे आणि अक्षर पुरुष म्हणजे क्षेत्रज्ञ किंवा आत्मा हा पुरुषोत्तमाचाच अंश आहे. असे समग्र ज्ञान मिळविणे हा देहस्थ आत्म्यासाठी मोक्ष मिळविण्याचा मार्ग आहे. या समग्र ज्ञानाच्या बळावर अपरा प्रकृतीच्या नामरूपांच्या बंधनातून आत्मा मोकळा होऊ शकतो. गीतेने आरंभापासून ही पुरुषोत्तमाची कल्पना व्यक्त केली असली तरी या पंधराव्या अध्यायात ती सूत्ररूपाने स्पष्टपणे मांडली आहे. म्हणून या अध्यायातील 'पुरुषोत्तमयोग' संपूर्ण गीतेचे सार आहे. एकाच पुरुषोत्तमाची सर्वभावे भक्ती करावी, सर्वत्र एकच ब्रह्म आहे, याचा पुनःपुन्हा उच्चार गीतेने केला आहे. पुरुषोत्तमाची कल्पना पुढे ठेवून शेवटी हा खरा अद्वैत सिद्धान्त गीतेने इथे प्रतिपादिला आहे. प्रकृतीच्या विविधरूपी अनेकतेच्या पसाऱ्यात मूळ एकमेव, शाश्वत, सद्वस्तू अखंड, अभंग आहे याचा अनुभव घेणे म्हणजे कृतकृत्य होणे होय. म्हणून भगवंत २० व्या श्लोकात म्हणत आहेत की, हे अद्वैत शास्त्र सर्वात गुह्य असे शास्त्र आहे. जो हे शास्त्र सांगोपांग अभ्यासील म्हणजे आपले ज्ञान, भावना, शक्ती, अनुभूती या शास्त्राच्या शिकवणीनुसार करील, तो सर्वांगांनी पूर्ण होईल. दिव्य आनंदाचा, शाश्वत तत्त्वाचा, ब्राह्मस्थितीचा अधिकारी होईल.

**।। ॐ श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**

सर्वांसाठी

# गीता

एक जीवनग्रंथ

भाग-४



## लेखक - परिचय

| | | |
|---|---|---|
| नाव | : | प्रा. दत्तात्रय नारायण दुभाषी |
| जन्म | : | १९ जानेवारी १९४१ बेळगांव |
| शिक्षण | : | १) एम. ए. (इंग्रजी - संस्कृत)<br>२) एम. ए. (मराठी) |
| व्यवसाय | : | पत्रकार व माध्यमिक शिक्षक म्हणून १० वर्षे व महाविद्यालयीन प्राध्यापक म्हणून ३० वर्षे अशी एकूण ४० वर्षे सेवा. गोपाळकृष्ण गोखले कॉलेज, कोल्हापूर येथून इंग्रजी विभागप्रमुख म्हणून निवृत्त. |
| छंद व आवड | : | • सतत भ्रमण - ५ वेळा अमेरिका-कॅनडा येथे प्रदीर्घ वास्तव्य. युरोप-मिडलईस्ट इ. ठिकाणचा प्रवास.<br>• वक्तृत्व - नाट्य - लेखन यांच्या विशेष आवडीमुळे वर्तमानपत्रे व मासिकांतून अनेक विषयांवर व्याख्याने व लेखन.<br>• निसर्गात पदभ्रमणाची विशेष आवड.<br>• योग-प्राणायाम यावर प्रबोधन - व्याख्याने व प्रात्यक्षिके. |
| सामाजिक कार्य | : | • श्री ज्ञानेश्वरी, तुकाराम गाथा अशा संतसाहित्यावर व भगवद्गीतेवर गेली १५ वर्षे सतत प्रवचने व व्याख्याने यातून समाजप्रबोधन.<br>• गीता व ज्ञानेश्वरी यावरील लेखमाला प्रसिद्ध.<br>• अध्यात्म व तत्त्वज्ञान याचा प्रचार व प्रसार हेच जीवनध्येय |
| संपर्क | : | २४६ ए/ई, रत्नोदय सोसायटी, नागाळा पार्क,<br>कोल्हापूर. ✆ : ०२३१-६५१०४४ |